महाकवि कालिदासविरचित

# मेघदूत

( समश्लोक, समवृत्त, सयमक मराठी अनुवाद )

-: अनुवादक :-

श्री. गणेश नीलकण्ठ कात्रे,

बी. अे., अेल्‌अेल् अेम्., [अर्नोल्ड् स्कॉलर].

सेवा-निवृत्त डिस्ट्रीक्ट जज्ज.

प्रथमावृत्ति १९५५.

मूल्य रु. १-८-०.

★★★★★★★★★★

प्रभुकृपेनें जिच्याबरोबर आज तीस
वर्षांहून अधिक काळ भाग्यानें
संसार-यात्रा केली, त्या माझ्या
**पत्नीस** ही माझी पहिलीच
वाङ्मयकृति प्रेमादरपूर्वक
अर्पण करीत आहे.

— ग. नी. कात्रे.

★★★★★★★★★★

मुखपृष्ठाच्या चित्रास आधारभूत श्लोक पुढीलप्रमाणें-

ह्रित्वा तस्मिन्भुजगवलयं शंभुना दत्तहस्ता
क्रीडाशैले यदि च विचरेत्पादचारेण गौरी ।
भङ्गीभक्त्या विरचितवपुः स्तम्भितान्तर्जलौघः
सोपानत्वं कुरु मणितटारोहणायाग्रयायी ।।

-पूर्वमेघ श्लोक ६०.

● ● ● ●

# पुरस्कार

कालिदासाचें मेघदूत म्हणजे विदग्धजनांच्या बुद्धीस दिलें गेलेलें एक सनातन आव्हान आहे. हें आव्हान दोन प्रकारचें आहे. एक वाङ्मयाच्या सहेतुकत्वाची उपपत्ति मान्य असणाऱ्या लोकांना आहे, तर दुसरें त्याचा अनुवाद करूं पाहणाऱ्यांच्या विजिगीषेस आहे. श्रेष्ठ ललित कृतींच्या मूळाशीं निदानपक्षी उद्बोधनाचा हेतु असतो, असें साहित्य-विमर्शक आजवर प्रतिपादीत आले आहेत. मेघदूताच्या निर्मितीमागें काव्याचें ' सकलप्रयोजनमौलिभूत ' असें प्रयोजन जो आल्हाद, त्यापेक्षां इतर कोणत्या प्रकारचा हेतु आहे, त्यापासून कोणत्या प्रकारचा बोध मिळतो वा उद्बोधन होतें, या प्रश्नास खरोखर समाधानकारक उत्तर मिळालें असें अद्यापि झालें नाहीं. प्रस्तुत अनुवादाच्या कर्त्यांनींहि असें एक उत्तर सुचविलें आहे. त्याचा रसिकांनीं अवश्य विचार करावा; परतु त्यानेंहि समाधान होईल, असें वाटत नाहीं. बहुतेक विमर्शक मेघदूतास अपवाद मानूनच आपला वाङमयाच्या सहेतुकत्वाचा पुरस्कार करीत असतात.

पण यापेक्षां मेघदूताचें अधिक प्रबळ असें आव्हान (आणि आकर्षणहि) त्याच्या भाषांतराबाबतचें आहे. मेघदूताचीं केवळ मराठी व पद्यमय अशीं भाषांतरेंहि दहाच्या घरांत जातात व ही संख्या येथें थांबेल, अशी खात्री देववत नाहीं. या भाषांतरकर्त्यांत शास्त्री आहेत, सॉलिसिटर आहेत, डॉक्टर आहेत, कवि आहेत व अर्थशास्त्रज्ञ राजपुरुषहि आहेत या अखेरच्या भाषान्तरानें त्यांत आतां एका न्यायाधीशाचाही अंतर्भाव होत आहे. इतक्या विविध व्यवसायांत असणाऱ्या या व्यक्तींना मेघदूताच्या भाषांतरांत आपलें अनुवादकौशल्य पणास लावावेसें वाटतें यांतच मेघदूताच्या आकर्षणांतील सामर्थ्याचा प्रत्यय येत आहे. अनुवादाविषयींचा सामान्य विचार येथें पुरेसा पडत नाहीं. त्यांत मेघदूताच्या अनुवादांत असणारे आणखी कांहीं प्रश्न निर्माण होतात. ते कोणते याचा आपण प्रथम विचार करूं.

काव्याचा अनुवाद गद्यांत करणें ही गोष्ट (असा एक अनुवाद मेघदूताचाही मराठीमध्यें झालेला आहे) शक्य असली तरी अनुरूप वाटत नाहीं

असा बहुतेकांचा अनुभव असतो. गद्यापेक्षां पद्याला कांहीं आकृतिविशेष असतो. तो मूळ काव्याला जसा, तसा त्याच्या अनुवादालाही असावा अशी अपेक्षा साहजिकच निर्माण झालेली असते. मेघदूताबाबत या अपेक्षेला अधिकच निश्चित व परिच्छिन्न असें स्वरूप प्राप्त होतें. संस्कृत मेघदूत हें मन्दाक्रान्ता या श्रवणमधुर अशा, विरहवर्णनास अनुरूप ठरलेल्या वृत्तामध्यें लिहिलें गेलें असल्यानें त्याला जें एक आकृतिवैशिष्टय व नादसौंदर्य लाभलें आहे, तें त्याच्या अनुवादांत गमावूं नये असें अनुवादकर्त्याला वाटणें ही गोष्टहि अगदी स्वाभाविक आहे. प्रस्तुत भाषांतराचे कर्ते श्री. कात्रे यांच्याहि 'मंदाक्रांतेखेरीज इतर वृत्तांत अनुवाद करण्याचें' मनांतहि आलें नाहीं, याचें कारण हेंच असावें मंदाक्रान्ता वृत्त मराठी काव्यांत उपलब्धच नसतें तर वेगळी गोष्ट होती. परंतु तें उपलब्ध असतांना इतर वृत्ताचा आश्रय करण्याची कल्पना ही प्रथम स्फुरणाची नव्हे. इतर वृत्तांत अनुवाद करण्याचे प्रयत्न मराठींत होऊन गेले आहेतच. अगदीं पहिलाच व रसिकमान्य असा **कृष्णशास्त्री चिपळूणकर** यांनीं केलेला अनुवाद **साकी** वृत्तामधील आहे. त्या अनुवादाची सरसता मतभेदातीत असली, तरी मेघदूताचें आकृति वैशिष्टय त्यांत सुटलें आहे ही रुखरुख कायम रहाते यांत शंका नाहीं. हीच गोष्ट डॉ. **श्रीखंडे** व कवि **कुसुमाग्रज** यांच्या अनुवादाबाबत वेगळ्या प्रकारानें होते. डॉ. **श्रीखंडे** यांनीं उपजाति या संस्कृत वृत्ताचा आश्रय केला आहे व **कुसुमाग्रज** यांनीं **समुदितमदना** या जातीचा उपयोग केला आहे. मेघदूताच्या एकेका श्लोकाकरितां **दोनदोन** उपजातींचा उपयोग करावा लागल्यानें एकेका श्लोकांत दोनदोन भाग पडल्याचा जो भास डॉ. **श्रीखंडे** यांच्या अनुवादांत होत राहतो, तो मेघदूतांतील एकेका श्लोकाच्या एकात्मतेच्या परिणामास विघातक होतो ही गोष्ट विसरतां येत नाही. उपजातीच्या एकेका श्लोकांतहि चारचार चरण येत असल्यानें संस्कृत एकेका श्लोकाचे अनेक खड होत असल्याचा परिणामहि इष्ट वाटत नाहीं. मंदाक्रान्तेचें नादसौंदर्य उपजातींत येत नाहीं, हा विचार वेगळाच. **कुसुमाग्रजां**च्या अनुवादांतहि संस्कृत एकेका श्लोकास '**समुदितमदने**'च्या चार ओळी म्हणजे दोन द्विपदी येतात. परंतु उपजातीच्या दोन श्लोकांनीं आठ चरणांचा जो भास होतो, तसा न होतां मंदाक्रान्तेमधील चार चरणांसारखाच परिणाम होतो, ही एक अधिक अनुकूल बाब समजा-

वयास पाहिजे. मंदाक्रान्तेचें नादसौंदर्य कांहींसें मान्थर्याकडे झुकणारें आहे; समुदितमदनेमध्यें त्या मानानें चापल्य अधिक आहे, हा त्या दोहोंत असणारा फरक होय. तथापि उपजातीपेक्षां 'समुदितमदना' नादमाधुर्यास अधिक अनुकूल आहे, यांत शंका नाहीं.

मेघदूताच्या अनुवादाकरितां मंदाक्रान्तेची निवडच योग्य असें ठरलें तरी मूळ एका श्लोकास भाषांतरांत एकच श्लोक योजणें आवश्यक आणि इष्ट आहे काय हा प्रश्न शिल्लक राहतोच. कोणत्याही भाषांतराचें यश मूळांतील आशय, त्याच्या सूक्ष्म व सूचित अर्थच्छटांसह, संपूर्णतः अनुवादामध्यें उतरण्यावर बव्हंशीं अवलंबून आहे, यांत शंका नाहीं. मेघदूताच्या एका श्लोकामधील आशय मराठीमधील अनुवादाच्या एका श्लोकांत आणणें ही गोष्ट मात्र अशक्यप्राय आहे. मेघदूत हें संस्कृतसारख्या समासबहुल भाषेत लिहिलें गेल्यानें त्याच्या एकेका श्लोकांत कालिदासाला पुष्कळच अर्थ भरतां आला आहे. मराठी भाषा मूळची असमासा भाषा असल्यानें आज जरी तीमध्यें संस्कृतच्या अनुकरणानें समास योजतां येत असले, तरी त्यांचा विशेष वापर तिला करितां येत नाहीं. यामुळें संस्कृतमधील एका श्लोकाचा संपूर्ण आशय मराठीमधील त्याच वृत्ताच्या एका श्लोकांत आणणें ही गोष्ट अशक्य झाल्यास त्यांत आश्चर्य नाही. यामुळेंच संस्कृतमधील मूळ आशय मराठीमध्यें आणण्याकरितां **लेलेशास्त्री** यांनीं मळांतील चार ओळींऐवजीं प्रायः सहा, आठ वा अधिक ओळी अनुवादांत योजिल्या आहेत. मंदाक्रान्तेचें नादमाधुर्य कायम ठेवून मूळांतील समग्र अर्थ अनुवादांत यावा याकरितां मूळ आकृतिवैशिष्ट्यांत केलेला हा फरक योग्यच होता असें म्हणावयास खरोखर अडचण नव्हती.

परंतु मानवाच्या आकांक्षेस मर्यादा नसते. तिनें मेघदूताच्या अनुवादकर्त्यांना आणखी एक बंधन स्वतःवर स्वखुषीनें घालून घ्यावयास लावलें व समवृत्ताबरोबर समश्लोकी भाषांतराचा प्रयत्न करावयास प्रवृत्त केलें. आपल्या कार्यांत अधिक अडचणी असूनहि आपण यशस्वी झालों ही अभिमानमूलक आकांक्षाच केवळ यापाठीमागें होती, असें मात्र नाहीं. आकृतिवैशिष्ट्याबद्दलच्या ज्या सूक्ष्म अभिरुचीनें गद्याऐवजीं पद्य आणि इतर पद्य-

प्रकारांऐवजीं मंदाक्रान्ता वृत्तच स्वीकारण्यास अनुवादकांस प्रवृत्त केलें, तिनेंच त्यांना अधिक पुढें नेऊन समश्लोकी अनुवादापर्यंत आणून सोडलें. मेघदूताचा स्वभावविशेषच याचें कारण आहे. त्यांतील प्रत्येक श्लोक हा आकारदृष्टया अत्यंत सुवृत्त असा व अर्थदृष्टया अत्यंत घन असा मणि आहे. अशा सारख्या आकाराच्या मण्यांचा हा हार आहे. समग्र अर्थ मराठींत आणण्याकरितां त्या श्लोकार्थांचा आकार ६, ८ किंवा १० ओळींपर्यंत वाढविणें हें त्यांत आकृतिदृष्टया विषमता आणण्यास कारणीभूत होतें, एवढेंच नव्हे, तर त्यांतील अर्थघनता कमी करून इष्ट अशा आकारापेक्षां अधिक मोठा आकार येण्यास कारण होतें याची जाणीव आकृतिवैशिष्टयाबाबत चोखंदळ दृष्टि असणाऱ्या रसिकाला झाल्यावांचून राहत नाहीं. म्हणून सहा, आठ वा दहा चरण अशा विषम आकाराच्या खंडाची योजनाच सोडून देणें भाग पडलें असें नसून चारपेक्षां अधिक चरणांची योजनाही अशा चोखंदळ रसिकांस मान्य झाली नाहीं. मेघदूताचे जे सहासात समश्लोकी अनुवाद झाले, त्यांमागील ही भूमिका लक्षांत घेतल्यावांचून या अनुवादांच्या कर्त्यांच्या वृत्तीचें आकलन होणें कठिण आहे.

पण मूळांत नसलेलें आणखी एक बंधनहि अनुवादकर्त्यांनीं आपल्यावर घालून घेतलें आहे व तें म्हणजे यमकांचें. संस्कृत मेघदूतांत यमक नाहीं, पण मेघदूताच्या कोणत्याच अनुवादांत हें बंधन तोडलें गेलें असें झालेलें नाही. ज्यांनीं मंदाक्रान्तेखेरीज इतर पद्यप्रकारांचा आश्रय केला व चार ओळीं-ऐवजीं अधिक ओळी रचण्याचें स्वातंत्र्य घेतलें, त्यांनीं याची भरपाई म्हणून मूळांत नसलेलें यमकाचें बधन स्वीकारलें, तर तें कदाचित् समर्थनीय ठरलें असतें, पण समवृत्त-समश्लोकत्वाची मर्यादा ज्यांनीं पाळली, त्यांना सयमकत्वाचें बंधन स्वीकारण्याचें खरोखर कारण नव्हतें पण मराठीची प्राचीनकाळापासून चालत आलेली परंपरा, त्यांना निर्यमक रचना करूं देईना व जे बंधन कदाचित् कालिदासालाहि जाचक वाटलें असतें, तें स्वीकारून त्यांनीं आपलें मूळचेंच अवघड काम अधिकच कठिण करून घेतलें. मराठी काव्यांतील यमकाच्या वादांत यमकाची कैफियत ज्या मुद्द्यावर मांडण्यांत आली, त्याच मुद्द्याचा आश्रय करून अनुवादकांनीं आपल्यावर

लादून घेतलेल्या या बंधनाचेंहि समर्थन होऊं शकेल. मराठी भाषा संस्कृतच्या मानानें माधुर्याच्या बाबतींत न्यून असल्यानें यमकानें त्याची भरपाई कांहीं प्रमाणांत तरी होते व म्हणून मराठी कवितेस यमक हें इष्ट व आवश्यक आहे हा तो विचार होय. मराठीच्या प्राथमिक अवस्थेंत हें कदाचित् खरें असलें, तरी आतां ' स्त्रीला प्रौढ वयांत नूपुर-झणत्कार त्रपा देतसे ' असें दिलें गेलेलें उत्तरहि लक्षांत घ्यावयास हरकत नाहीं.

श्री. कात्रे यांनींहि समवृत्तत्व, समश्लोकत्व आणि सयमकत्व अशीं बंधनें स्वीकारूनच हा अनुवाद केला आहे. दुसऱ्या कोणत्या प्रकारें तो करावा असें आपल्या मनांतहि आलें नाहीं, असें ते सांगतात. तेव्हां अनुवादकांची स्वाभाविक स्फूर्ति अशीच असते, हें मान्य करूनच अनुवाद किती यशस्वी झाला आहे याचा विचार करावा लागतो. यामध्यें उपस्थित होणारे एकदोन प्रश्न विशेष महत्त्वाचे आहेत. अनुवादाच्या यशाचें महत्त्वाचें गमक वर उल्लेखिल्याप्रमाणें मूळांतील आशय संपूर्णतः अनुवादांत व्यक्त होणें हें आहे. संस्कृतमधून मराठीमध्यें केलेल्या अनुवादांत हा आशय संपूर्णतः व्यक्त होणें हें अशक्यप्राय आहे, हें तितकेंच खरें आहे. समासांच्या सोयीमुळें संस्कृतमध्यें थोड्या जागेंत पुष्कळ अर्थ भरतां येतो व मराठींत तो तितका भरतां येत नाहीं, ही गोष्ट मतभेदातीत आहे. तेव्हां मूळांतील कांहीं आशय वा अर्थ अनुवादांत आलेला नसणें ही गोष्ट अपरिहार्य आहे. हा गाळलेला किंवा गळलेला भाग महत्त्वाचा असूं नये, पण गौण असावा; पण महत्त्वाचा भाग गळला नसला म्हणजे भाषांतर चांगलें झालें आहे असें समजावें हा एक मार्ग आहे. परंतु मुख्य भाग कोणता व गौण कोणता याबाबत मतभेद होणें शक्य आहे व त्यापेक्षांहि अधिक महत्त्वाचें म्हणजे असे गाळले तरी चालतील असे गौण भाग महाकवीच्या काव्यांत व त्यांतील बहुतेक श्लोकांत असतात, अशी मान्यता यांत अंतर्भूत आहे. महाकवींच्या रचनेंत प्रत्येक शब्दास, त्याच्या अर्थास आणि त्यांतील सूक्ष्म व सूचित छटेसहि खरोखर कांहीं महत्त्व असतें असें म्हणतात व अनवश्यक भाग मुळींच न येणें हें उत्कृष्ट कलाकृतीचें वैशिष्टय समजलें जातें. अशा स्थितींत थोडीथोडी, पण प्रत्येक श्लोकांत तुलनेनें गौण अशा अर्थाची हानि होत असणें हें अनुवादकाच्या

यशाच्या दृष्टीनें कितपत योग्य आहे हा महत्त्वाचाच प्रश्न समजावयास पाहिजे.

दुसरा प्रश्न भाषांतराच्या प्रयोजनांतून निर्माण होतो. मेघदूताचें मराठी भाषांतर कशाकरितां करावयाचें ? अर्थात् संस्कृत न जाणणाऱ्या मराठी वाचकाकरितां. अशा मराठी वाचकांकरितां तें करावयाचें तर तें तितकेंच सुबोध व्हावयास पाहिजे. भाषांतरांत मूळांतील अर्थसौंदर्य, कल्पनासौंदर्य, रचनासौंदर्य यांचा प्रत्यय यावयास हवा. मराठींत संस्कृत शब्दांचा भरणा बराच आहे. त्याचा फायदा अर्थात् अनुवादकास घेतां येईल. परंतु त्यालाहि मर्यादा आहे. संस्कृतमध्यें अगदीं स्वाभाविक वाटेल, इतकीहि सामासिकता मराठी भाषांतरांत येतां कामा नये, त्यांत क्लिष्टता असू नये. चांगल्या भाषांतराचें एक दुधारी गमक म्हणतां येईल तें असें, कीं त्यामुळें मूळ ग्रंथाकडे जाण्याची आवश्यकता उरू नये, पण मूळ कसें असेल हें जाणून घेण्याची इच्छा, किंबहुना त्याकरितां ती मूळ भाषाहि शिकावी अशी प्रबल इच्छा व्हावी. भाषांतर अस्पष्टबोधक किंवा क्लिष्ट झाल्यानें मूळांत काय आहे, हें पहावें लागणें हें भाषांतरास भूषणावह नाहीं. कित्येक भाषांतरांबाबत असा अनुभव येतो कीं तें स्वतंत्रपणें वाचणारे लोक कमी, भाषांतर बरोबर झालें आहे की नाहीं याकरितां दोन्ही ताडून पहाणारे व तद्विषयक चर्चा करणारे उभयभाषाभिज्ञच अधिक. त्यांना खरोखर काव्यास्वादाकरितां भाषांतर वाचण्याची गरजच नसते; काव्यास्वादापेक्षां भाषांतर कसें झालें आहे याबद्दलचें कुतूहलच अधिक. अशीं भाषांतरें मूळांतील अर्थ कितीहि प्रमाणांत व्यक्त करीत असलीं तरी भाषांतराच्या उद्दिष्टाच्या दृष्टीनें अयशस्वीच म्हणावयास हवींत.

हे सर्व विचार लक्षांत घेऊनच कोणत्याहि मेघदूतानुवादाचें यशापयश अजमवावें लागतें. केवळ अर्थदृष्टचा विचार केला, तर ज्यांनीं समवृत्त-समश्लोकीचा आश्रय केला नाहीं, त्यांचीं भाषांतरें सरस ठरण्याचा अधिक संभव असतो, हें कांहीं सांगावयास नको. परंतु मेघदूतानुवादांत मंदाक्रान्तेचें नादमाधुर्य व एकेक श्लोकाची सुवृत्तता या बाह्यांग सौंदर्याचा त्याग करावयास तयार नसलेल्या रसिकांनाहि दोष देतां येईल, असें वाटत नाहीं. तें साधण्या-

करितां कांहीं गौणार्थच्छटांचा त्याग करण्यांत ते चुकले असें म्हणतां येणार नाहीं. मात्र या सौद्यांत किती अर्थाला मुकावें लागतें, तें अवश्य पहावयास हवें.

श्री. कात्रे हे व्यवसायानें न्यायाधीश होते. कोणत्याहि प्रश्नामधील अधरोत्तर पाहण्याची दृष्टि त्यांना लाभलेली आहे. मेघदूताच्या भाषांतराबाबत वर उल्लेखिलेल्या सर्व विचारांचे बलाबल पाहूनच त्यांनीं समवृत्त-समश्लोकी-सयमक भाषांतरास हात घातला. तें भाषांतर संपवून बराच काळ, निदान १०-१२ वर्षें तरी, त्यांनीं त्याची सतत चर्वणा केली आहे; आणि आपल्यापुरते तरी कायमचे असे निर्णय घेऊनच आज आपलें भाषांतर ते महाराष्ट्रीय रसिकास सादर करीत आहेत. आपला अनुवाद करितांना त्यांनीं इतरांचे अनुवाद डोळ्यांपुढें न ठेवितां तो केला आहे. त्यांचें संस्कृतचें अध्ययन व ज्ञान सूक्ष्म आहे. या सर्व कारणांनीं समवृत्त-समश्लोकी अशा मेघदूताच्या भाषांतरांत त्यांचें भाषांतर अधिक यशस्वी झालें आहे, यांत नवल नाहीं. भाषांतर केवळ मराठी वाचकास, अर्थात् संस्कृत शब्दसंग्रहाशीं व सामासिक रचनेशीं ज्याचा कांहीं किमान परिचय आहे, अशा सुविद्य मराठी वाचकाला क्लिष्ट वाटणार नाहीं, अशी काळजी त्यांनीं घेतली आहे. पुढील श्लोक नमुन्यादाखल पहावे—

> ' आला वर्षासमय, म्हणुनी धीर द्यावा प्रियेस–
> मेघद्वारें कुशल वदुनी ' वाटलें गुह्यकास ।
> सन्मानार्थें कुटजकुसुमें अर्पुनी त्यास ताजीं
> संतुष्टात्मा मधुर वचनें स्वागतालागिं योजी ॥
>
> कोठें ज्याचा पवनसलिलीं धूमतेजांत जन्म
> कोठें प्राण्या सुचतुर अशा साध्य, तें दूतकर्म !
> नेणोनी हें विनवित घना यक्ष औत्सुक्ययुक्त
> कामार्तांना फरक न कळे चेतनाचेतनांत !

संस्कृतमधील जे शब्द सामान्य सुविद्य मराठी वाचकास परिचित आहेत ते तसेच ठेवल्यानें भाषांतर साहजिकच मूळास धरून होतें. त्याचा

फायदा कुटजकुसुम, गुह्यक, कामार्त, चेतनाचेतन इत्यादि शब्दांच्या योजने-मुळें झाल्याचें आपल्यास सहज दिसून येतें. अनुवादकर्त्याची कसोटी पाहण्या-च्या अचूक जागा म्हणजे मूळांतील अर्थान्तरन्यास-स्वरूपाच्या ओळी. त्या मूळ कवितेमध्यें जशा लक्षणीय, वेधक असतात, तशा भाषांतरांतहि उतर-लेल्या असल्या म्हणजे मूळांतील परिणामहि साधतो. प्रस्तुत अनुवादामधील अशीं स्थलें पाहिलीं असतां अनुवादाचें यश लक्षांत येण्यासारखें आहे–

(१) स्त्रीचें प्रेमी हृदय हळवें पुष्पसें विप्रयोगीं,
आशाबंधाविण न कुणिहि सांवरी त्याजलागीं ।

(२) दुष्टात्म्यांची उपकृति नको, थोर नाहीं म्हणोत !
[ याञ्चा मोघा वरमधिगुणे, नाधमे लब्धकामा ]

(३) निःसाराला कुणि न पुसती, मान देती समृद्धा !
[ रिक्तः सर्वो भवतिहि लघुः पूर्णता गौरवाय ]

(४) स्त्रीची भाषा प्रथम रमणीं मुग्ध शृंगार जाण !
[ स्त्रीणां आद्यं प्रणयवचनं विभ्रमो हि प्रियेषु ]

(५) वर्णे काळा असशि, परि तूं अंतरीं शुद्ध होशी !
[ अन्तःशुद्धस्त्वमपि भविता, वर्णमात्रेण कृष्णः ]

(६) थोरांचें तें विभव असतें दीनदुःखें हराया !
[ आपन्नार्तिप्रशमनफलाः संपदो ह्युत्तमानाम् ]

याचप्रमाणें अर्थान्तरन्यास-स्वरूप नसलेले भागसुद्धां श्री. कात्रे यांनी सहजपणें व अर्थ बहुतांशीं पूर्णपणें आणून उतरलेले ठिकठिकाणीं दिसतील. उदाहरणार्थ पुढील एक दोन श्लोक पहावे व त्यांची मूळाशीं तुलना करावी–

पत्नी ती मद्हृदय दुसरें, फार ना बोलणारी
जैशी व्हावी विरहविवशा चक्रवाकी बिचारी ।
उत्कंठेनें कठिण दिवसां कंठितां आज बाला
वाटावी ती हिमहत जणूं पद्मिनी मन्मनाला ।।

मूळांत 'गाढोत्कण्ठां गुरुषु दिवसेष्वेषु गच्छत्सु बालां' या चरणांत

'ग' या वर्णाचा आलेला अनुप्रास ' उत्कंठेनें कठिण दिवसां कंठितां ' या या रचनेंतहि आलेला दिसेल.

बोलायातें अडचण जरी ना सखींच्या पुढचांत
कर्णीं लागे धरुनि तव जो चुंबनाशा मनांत ।
होतां आज श्रवणनयनापार दूर प्रवासी
उत्कंठेनें रचित वचनें मन्मुखें सांगण्यासी ॥

भाषांतरवाचनांत अर्थप्रतिपत्तीकरितां मूळाकडे धांव घ्यावी लागूं नये या अपेक्षेची पूर्ति या श्लोकांत कशी झाली आहे, तें सहज कळून येईल.

भाषांतराबाबत जशा कांहीं करणरूप अपेक्षा असतात, तशा कांहीं अकरणरूप अपेक्षाहि असतात. भाषांतरकर्त्यानें मूळांतील आशय सामग्र्यानें अनुवादांत आणणें हें जसें आवश्यक आहे, तसेंच मूळांत नसलेलें कांहींहि येऊं न देण्याची दक्षताहि त्याला घ्यावी लागते. याबाबत कित्येकांचे कांहीं गैरसमज असलेले दिसून येतात. मूळांत विरोधी नसणारा असा पूरक मजकूर रचनेच्या सोयीकरितां अनुवादांत घालावयास प्रत्यवाय नाहीं असें एक मत आहे. एवढेंच नव्हे, तर मूळ कित्येक ठिकाणीं असमाधानकारक असल्यास थोडासा फरक करून तें सुधारून घेणेंहि योग्य ठरतें. अनुवादकर्त्याचे चाहतेहि अनेक वेळां अनुवादकानें कित्येक ठिकाणीं मूळावरहि ताण केली आहे, अशा प्रकारचीं स्तुतिरूप विधानें करितांना आढळतात. खऱ्या भाषांतराच्या दृष्टीनें व तात्त्विक रीत्या हें अयोग्य आहे. भाषांतरांत मूळाची यथार्थ कल्पना देणें एवढेंच झालें पाहिजे. मूळांतील गुणरूप भागच त्यांत दिसावा व दोष किंवा न्यूनें व्यक्त होऊं नयेत, ही खरी दृष्टि नव्हे. मूळ कृति जशी असेल तशी, तिच्या दोषांसहितहि, अनुवादांत दिसली पाहिजे. पण यापेक्षांहि निराळा विचार असा कीं श्रेष्ठ कवीच्या रचनेंत असे सुधारण्यासारखे किंवा बदल करण्यासारखे भागहि क्वचितच आढळणार. काय हवें आणि काय नको याबाबतची त्या कवींची दृष्टि अनुवादकर्त्यानें अधिक प्रमाणांत मानली पाहिजे. श्रेष्ठ कलाकृतीत किंचितहि फरक करणें धोक्याचें असतें. कारण मूळ कवीनेंच आवश्यक तोच भाग ठेवून, त्याप्रमाणें अनवश्यक भाग वगळून रचना केलेली असते. मूळांतील भाग गाळणें हें जसें भाषांतरास उपकारक

नाहीं (कारण तें साभिप्राय असल्यानेंच कवीनें तेथें घातलेलें असतें), त्याप्रमाणेंच मूळांत नसलेलें कांहीं घालणें हेंहि उपकारक नाहीं; किंबहुना अपकारक ठरण्याचाच संभव अधिक. कारण महाकवीच्या दृष्टीला तें घालण्यासारखें वाटलें नाहीं म्हणूनच तें तेथें आलेलें नसतें. श्री. कात्रे यांनीं हा दण्डक कटाक्षानें पाळलेला दिसतो. कांहीं ठिकाणीं रचनेच्या सोयीकरितां मेघाला उद्देशून त्या अर्थाचीं संबोधनें घालण्यापलिकडे मूळांत नसलेला अर्थ भाषांतरांत त्यांनीं येऊं दिलेला नाहीं. उत्तर मेघांतील श्लोक २९ मध्यें जलधर हा शब्द, २२ मधील अंभोद ! हें संबोधन, १८ मधील अंबुवाह हें पद हीं अशीं उदाहरणें होत. वस्तुतः मूळांत नसलेले हे शब्द अनुवादांत घालतां आलेच कसे असा प्रश्न उद्‌भवतो व मूळांतील कांहीं अर्थ गळला असल्याचेंहि दिसून येतें. उदाहरणार्थ, अंबुवाह हें पद जेथें आलें आहे, त्या ओळींतील 'प्रथमकथिते' व 'रम्यसानौ' हीं दोन पदें 'आमुच्या' या एका शब्दानेंच आणावीं लागल्यानें त्या चरणांत रिकामी राहिलेली जागा अंबुवाह या संबोधनात्मक, अर्थात् विशेष भर न घालणाऱ्या, शब्दाची योजना श्री. कात्रे यांना करावी लागली. मूळांतील कांहीं अर्थ गळला तरी चालेल, पण तेथें नसलेला अर्थ मात्र येऊं नये हा भाषांतराबाबत अत्यंत इष्ट असलेला दंडक श्री. कात्रे यांनीं पाळला आहे, हें अर्थात् चांगलेंच झालें. हा भाषांतरकर्त्याच्या कवित्वाचा प्रश्न नसून श्रेष्ठ, महामान्य अशा कविच्या औचित्य दृष्टीबद्दल आदर असण्याचा आहे.

परंतु ही दृष्टि सुटली कीं मूळांत नसलेले अर्थ भाषांतरांत घालण्याचा मोह आवरणें कठिण जाते व कित्येक वेळां मूळांतील अर्थाचा विपर्यास होण्याचाहि संभव असतो. कृष्णशास्त्री चिपळूणकरांसारख्या रसिकाचीहि अशी चूकभूल होते, तर इतरांची गोष्ट कशाला ! मेघदूतांत अलकावर्णनांत कालिदासानें चंद्रकान्तमण्यांच्या जाळीदार पडद्यांचा उल्लेख ' तन्तुजालावलम्बाः चन्द्रकान्ताः ' असा केला आहे. वस्तुतः येथें अर्थाचा घोटाळा होऊं नये; पण अनवधानानें कृष्णशास्त्री यांनीं—

' शीतल व्हाया गळां घालिती चंद्रकान्त-मणि-हार '

असें भाषांतर केलें आहे. शीतलत्वाकरितां वाळयाच्या पडद्यांचा जसा आपण

उपयोग करितों, तसा अलकेंत चन्द्रकान्त-मण्यांच्या 'तन्तुजालां'चा उपयोग करीत. शास्त्रीबोवांच्या भाषांतरावरून यक्षस्त्रिया त्यांचे हार गळयांतच घालीत असा समज होईल; व तेथें त्यांना पाझर फुटल्यास 'स्फुटजललव-स्यंदा'मुळें त्यांची स्थिति खरोखर चमत्कारिकच व्हावयाची. अनुवादकर्त्यानें मूळाशीं अविरोधी असा नवीन भाग घातल्यास एक वेळ चालेल (तेंहि त्यानें करूं नये), पण मूळाचा विपर्यास तर मुळींच होऊं न देण्याची काळजी त्यानें घेतली पाहिजे. कृष्णशास्त्री यांचें अनुकरण करून लेले व दामले या पुढील दोन अनुवादकांनींहि तसेंच केलें. क्वचित् हें मूळांतील अर्थ न कळल्यामुळेंहि होईल, पण बहुधा मूळांत फरक करण्यास हरकत नाहीं या भावनेमधून हे प्रसंग उद्भवतात. ' मध्ये क्षामा ' याचें एका अनुवादकानें 'सिंहश्रोणी' असें भाषांतर केल्याचें दिसतें तें यामुळेंच. सिंहाची कटि कृशत्वाचें उपमान आहे, श्रोणी नाहीं हें लक्षांत राहिलें नाहीं. असे विपर्यास होऊं न देण्याची काळजी श्री. कात्रे यांनीं घेतली असल्याचें कोणाहि वाचकास दिसून येण्यासारखें आहे.

असें असलें तरी श्री. कात्रे यांच्या अनुवादांतसुद्धां कांहीं स्थळांबाबत मतभेद होणें शक्य वाटते. उदाहरणार्थ उत्तर मेघांतील ११ वा श्लोक पहावा. अलकेंतील स्त्रियांच्या अलंकरणास उपयोगी अशा सर्व वस्तु एका कल्पवृक्षाकडून पुरविल्या जातात, असें त्या श्लोकांत वर्णन आहे. चित्रविचित्र वस्त्रें, किसलययुक्त पुष्पें, लाक्षाराग व नयन-विभ्रमोत्तेजक मधु या सर्व गोष्टी इतरत्र वेगवेगळया ठिकाणांहून पैदा कराव्या लागतात असा नेहमींचा सामान्यजनांचा अनुभव; पण अलकेंत तशी स्थिति नव्हती. एक कल्पवृक्ष तेथें हवें तें देऊं शकत असे. मूळांत ' एकः सूते सकलमबलामण्डनं कल्पवृक्षः ' असें आहे. अनुवादांत 'एक' शब्द गळला आहे, तो अर्थहानि करतो, असें वाटतें. एकः आणि सकलं सूते या शब्दयोजनेनें अलकेंतील या वैशिष्टयाचें दर्शन जसें स्पष्टपणें होतें तसें 'नारींना हीं सकलचि तिथें चिंतितां कल्पवृक्षा' या अनुवादानें होतें असें वाटत नाहीं. 'एक' हा शब्द लहान किंवा एकटा असला, तरी तो महत्त्वाचा होता असें वाटतें. उत्तर मेघाचा २७ वा श्लोक पहावा. त्यांत यक्षानें यक्षपत्नीचें ' न प्रबुद्धां, न सुप्तां ' अशा अवस्थेचें वर्णन आभाळ आलेल्या दिवशींच्या कमलिनीची उपमा देऊन केलें आहे.

अर्धवट उघडलेले व अर्धवट मिटलेले डोळे असण्याची जी अवस्था तीहि सौंदर्यविशेषानें युक्त असते. निद्रालु नेत्राचा उल्लेख स्त्रीसौंदर्यवर्णनांत करण्याकरितां कित्येकदां होतोहि. म्हणून ' न प्रबुद्धां, न सुप्तां ' या अर्थाच्या शब्दयोजनेस या श्लोकाच्या भाषांतरांत अवश्य स्थान मिळावयास हवें होतें. त्याऐवजीं नुसत्या 'दीनवाणी' शब्दानें काम भागणारें नाहीं. काय महत्त्वाचें आहे व काय नाहीं याबद्दल मतभेद होणें अगदीं स्वाभाविक आहे, असें मी आरंभींच म्हटलें होतें, तसें हें स्थल आहे असें पाहिजे तर म्हणावें. तथापि हा मतभेद चिंतनीय आहे, एवढें तरी मान्य व्हावयास हरकत नाहीं. त्याच श्लोकाच्या पूर्वार्धांत अर्थव्यक्ति पुरेशी झाली नसल्याचें उदाहरण दिसेल. तो पूर्वार्ध असा–

जाळीमार्गें किरण शशिचे येत आल्हाददायी,
लोभें जाई परि फिरतसे मागुती त्याच पायीं ।

यांत कोण कोठें जाई हें स्पष्ट होत नाहीं. मूळांत चक्षु हा कर्ता असून नजर किंवा दृष्टि असा याचा अर्थ आहे. चंद्राचे किरण खिडकींतून आंत येत, ते एरवीं अमृतशिशिर असतात म्हणून त्यांकडे साहजिकच नजर जाते. पूर्वीच्या अनुभवानें तिकडे गेलेली नजर विरहांत विरुद्ध अनुभव आल्यानें जशी जाते, तशीच परत फिरते हा मूळांतील अर्थ. मूळांत पूर्वप्रिति असा शब्द आहे. त्यांतील पूर्व शब्द गाळून नुसतें 'लोभें' असें भाषांतर केलें आहे यांत थोडी अर्थहानि झाली आहे. ती लक्षांत न घेतली तरी 'किरणांकडे' व 'नजर' हे अर्थ तेथें व्यक्त असावयास हवेत. तिसऱ्या चरणांतील अर्थांतहि भेद झाल्यासारखा दिसतो. मूळ चरण

चक्षु: खेदात् सलिलगुरुभि: पक्ष्मभि: छादयन्तीं

असा आहे. त्याच्या अनुवादांत

दुःखाश्रूंचें मग न ढळतां लोचनांतून पाणी,

असें डोळयांतून पाणी सारखें वहात असल्याचें मनांत येतें. मूळांत पापण्या अश्रूंनीं जड (गुरु) झाल्यानें डोळे पूर्णपणें उघडत नव्हते व म्हणून ' न प्रबुद्ध, न सुप्त ' अशी ती दिसे असें वर्णन आहे. शेवटीं मुख्य वाक्य ' दीनवाणी होई ' याचा कर्ता जो यक्षपत्नी तिचा वाचक शब्द हा संबंध श्लोकांत

कोठेंच नसल्यानें व्याकरणदोषहि त्यामध्यें आला आहे. मूळांत प्रस्तुत ३-४ श्लोक 'सखीं' या द्वितीयेमधील पदाचें वर्णन करणारे असल्यानें हा दोष होत नाहीं. भाषांतरांत ती सोय नसल्यानें हा दोष निर्माण झाला आहे. अशीं आणखीहि कांहीं स्थलें दाखवितां येणें शक्य आहे. ' नैशो मार्गः सवितुरुदये सूच्यते कामिनीनाम् ' यांत ' कामिनींचा प्रचार ' या शब्दानें मराठी वाचकास अर्थबोध होणार नाहीं.

मेघदूताच्या कोणत्याहि अनुवादाचें परीक्षण शलाका-परीक्षेनें करणें अयोग्य आहे असें मला वाटतें. हें कामच असें आहे कीं, त्यांत कोठें ना कोठें त्रोट शिरकवण्यास वाव सहज मिळू शकतो. तो मुळींच मिळू नये, असें वाटत असेल, तर अनुवादकानें समवृत्त-समश्लोकीच्या भानगडींत न पडणेंच श्रेयस्कर. किंबहुना पद्यात्मक अनुवादाचा अंगीकारहि क्वचित् त्यास दगा देण्याचा संभव असतो. अनुवादकानें काय भूमिका स्वीकारली आहे व ती-मुळें कोणकोणतीं बंधनें आपल्यावर लादून घेतलीं आहेत, हें लक्षांत घेऊनच त्याविषयीं अभिप्राय देणें उचित होय. ही दृष्टि स्वीकारतां श्री. कात्रे यांनीं आपल्या अनुवादांत चांगलेंच यश संपादिलें आहे, असें निःसंदेहपणें म्हणतां येतें.

उत्कृष्ट कलाकृति दिसावयाला सोप्या पण असावयाला कठिण असतात. मेघदूत ही अशापैकींच एक कृति असल्यानें तिचें अनुवादकठिणत्व प्रथम लक्षांत येत नाहीं व नंतर लक्षांत येऊन उपयोग नसतो. तें एक वेड किंवा व्यसन आहे, मात्र तें कौतुकास्पद आहे, असें मला नेहमीं वाटत आलें आहे. त्यामुळें मेघदूताच्या अनुवादास, विशेषतः बंधनें स्वीकारून केलेल्या अनुवादास प्रवृत्त होणाऱ्या व्यक्तींच्या विवेकाबद्दल मला अनेक वेळां शंका आली तरी आदरहि वाटतो. ' अनारम्भो हि कार्याणां प्रथमं बुद्धिलक्षणम्' हें कोठें खरोखर खरें असेल, तर तें मेघदूताच्या भाषांतराबाबत असें मला वाटतें. पण लगेच ' प्रारब्धस्य अन्तगमनं द्वितीयं बुद्धिलक्षणम् ' हा उत्तरार्धहि लक्षांत येतो. हें द्वितीय बुद्धिलक्षण असणाऱ्या लोकांत श्री. कात्रे आज प्रविष्ट झाले आहेत. ते आपल्या कार्यांत बव्हंशीं यशस्वी झाले आहेत. यशाच्या पुढील काव्य-प्रयोजन जो अर्थ तो अर्थात् अशा कामांत मिळण्याऐवजीं जाण्याचा

संभवच फार. तथापि या हेतूनें मेघदूताच्या भाषांतरास आजवर कोणी प्रवृत्त झाला नाहीं; पुढेंहि होईल असें वाटत नाहीं. मेघदूताच्या अनुवादकास होणारा खरा लाभ एका उत्कृष्ट काव्यकृतीची पुनःपुनः होणारी चर्वणा व तन्मूलक काव्यानंद हाच आहे. तो श्री. कात्रे यांना मिळून चुकला आहे. त्यापुढें विद्वानांचा 'परितोष' हा कांहीं झालें तरी कमीच होय. महाराष्ट्रीय विदग्धजन त्यांच्या या अनुवादकृतीचें स्वागत केल्याखेरीज राहणार नाहींत.

म्युनिसिपल् कॉलनी, पुणें ४
१० एप्रिल १९५५

रा. श्री. जोग

● ● ● ●

# निवेदन

कालिदासाच्या मेघदूत काव्यासंबंधीं निबंधमालाकारांनीं असें लिहिलें आहे कीं, त्याचे इतर सर्व ग्रंथ नाहींसे होऊन तें एकच काव्य शिल्लक राहिलें असतें, तरी त्याची योग्यता आज आहे त्यापेक्षां यत्किंचितहि कमी झाली नसती. रघुवंश, शाकुंतल व मेघदूत यांनीं कालिदासास दिगंत कीर्ति मिळवून दिली आहे. शाकुंतल व मेघदूत यांचीं भाषांतरें जगांतील बहुतेक प्रमुख भाषांत झालीं आहेत व कालिदासविषयक वाङ्मयहि विपुल आहे. म. म. **वा. वि. मिराशी** यांचा 'कालिदास' व प्रा. **मा. दा आळतेकर** यांचा 'कालिदासाची सृष्टि' हे दोन ग्रंथ आपल्या भाषेंतील विशेष उल्लेखनीय असे मला वाटतात. कालिदास व त्याचे ग्रंथ यांसंबंधीं सांगोपांग माहिती जिज्ञासु वाचकांस त्यांत मिळेल.

मेघदूताचे श्रेष्टत्वाबद्दल स्वदेशीय व परदेशीय पंडितांचे अभिप्राय देऊन लेख लांबविण्याचा हेतु नाहीं. त्या सर्व अभिप्रायांचा निष्कर्ष असा आहे कीं कालिदासाचे सर्व काव्यगुण ज्यांत ओतप्रोत भरले आहेत, असें मेघदूत हें जगांतील वाङ्मयांतील सर्वश्रेष्ट पतिपत्नीचें विरहगीत आहे. कालिदास सुमारें १६०० वर्षांपूर्वीं होऊन गेला; तेव्हांपासून मेघदूताची मोहिनी पंडितांवर व कवींवर इतकी विलक्षण पडली आहे कीं, संस्कृतांत त्याचे धर्तीवर २०-२५ संदेश-काव्यें रचिलीं गेलीं आहेत; **जिनसेन** यांचें 'पार्श्वाभ्युदयम्' व **विक्रम** यांचें 'नेमिदूतम्' यांतील श्लोकांत मेघदूताचे एक अगर दोन चरण घालून समग्र मेघदूत समाविष्ट केलें आहे. या अनेक संदेश-काव्यांवरून व वरील प्रकारचे जैन कवींचे विलक्षण चातुर्याचे प्रयत्न लक्षांत घेतले म्हणजे मेघदूताविषयीं प्राचीन पंडितांस व कवींस केवढा थोर आदर वाटत असे, याची कल्पना येते. अनेक पंडितांनीं मेघदूतावर टीका लिहिण्यांत आपली प्रज्ञा शिणविली आहे व त्याची गोडी आजन्म पुरून उरणारी म्हणून कोणा रसिकानें ' माघे मेघे गतं वयः ' अशी उक्ति काढली आहे. मेघदूताची थोरवी वर्णन करण्यास एवढें मला या ठिकाणीं पुरेसें वाटतें.

निर्णयसागरचे प्रतींत मेघदूताचे श्लोक ११५ आहेत; पैकीं ६३ पूर्व मेघांत व ५२ उत्तर मेघांत. पूर्व मेघांत ४ व उत्तर मेघांत २ असे प्रक्षिप्त म्हणून ६ श्लोक दिले आहेत. पाश्वाभ्युदयम् काव्य विचारांत घेतां व अन्य कारणांनीं मी ६ पैकीं ३ च श्लोक अनुवादित केले आहेत.

पूर्व मेघांत शापांकित यक्षाची विरहावस्था, मेघाची दूत म्हणून योजना व ज्या रामगिरीवर यक्ष विरहकाळ कंठीत होता, तेथून अलके-पर्यंतचा मार्ग हीं आलीं आहेत. उत्तर मेघांत, अलकेचें वैभव, यक्षांचें विलासी जीवन, यक्षाचें गृह व यक्षपत्नीची विरहावस्था यांचीं वर्णनें असून शेवटीं यक्षसंदेश आहे. अशा या लहानशा कृतींत असे काय काव्यगुण भरले आहेत कीं, ज्यांमुळें त्याची इतकी विलक्षण मोहिनी रसिकांवर पडावी ! मेघदूताची मूलभूत कल्पना फार साधी आहे. ती अशी– ‘ कुबेर हा शंकराचा कोषाध्यक्ष व मित्र. कैलासाच्या पायथ्यावर वसलेली अलका ही त्याची राजधानी व तिच्या बाह्योद्यानांत शंकराचा निवास. कोणा एका तरुण यक्षाकडून कुबेराची नेमून दिलेली कामगिरी बजाविण्यांत कसूर झाली म्हणून त्यास कुबेरानें असा शाप दिला कीं, ज्या अर्थी पत्नीच्या आसक्तीमुळें तूं कामांत चुकारपणा केलास, त्या अर्थी तिचाच वियोग तुला वर्षभर होवो. ऐन तारुण्यांत घडलेला हा निर्वासितपणा यक्षास दुःसह्य वाटला व विरह काळ कंठण्याकरितां त्यानें पवित्र अशा रामगिरीचें एकांत स्थळ निवडलें. तेथें त्यानें विरहांत आठ महिने काढल्यावर एक दिवस पावसाळी मेघ त्यास रामगिरीवर दिसला. विमनस्क यक्षास असें वाटलें कीं, विनंति केल्यास उत्तरेकडे जाणारा हा मेघ पत्नीस आपलें कुशल कळवील व ती अवशिष्ट विरह काळ कसा तरी घालवील.’ सीताहरणानंतर प्रत्यक्ष राम भेटतील त्या पशुपक्ष्यांस सीतेबद्दल विचारणा करीत हिंडला व त्यानें हनुमानास सीतेच्या शोधार्थ लंकेस पाठविलें; या रामायणांतील कल्पनेवर मेघदूत कालिदासानें रचलें असें मानतात. मेघदूतांत्या पतिपत्नींच्या विरहावस्थेंतील भावना इतक्या सूक्ष्मतेनें व उत्कटतेनें कालिदासानें वर्णिल्या आहेत कीं, प्रत्यक्ष अनुभवाखेरीज अशा तऱ्हेचें मनास चटका लावणारें विरहकाव्य त्याचे हातून निर्माण झालें नसतें, असें मला वाटतें. या मतास म. म. मिराशी

यांच्या ग्रंथांत आधार सांपडतो. तेथें कालिदासासंबंधीं अशी माहिती आली आहे कीं, तो उज्जयिनीच्या **चंद्रगुप्त विक्रमादित्याच्या** आश्रयास होता व चंद्रगुप्तानें कांहीं काळ त्यास आपल्या मुलीचा मुलगा **कुंतलेश्वर प्रवरसेन** याच्या दरबारीं वकील म्हणून पाठविलें होतें. ती कामगिरी चंद्रगुप्ताच्या मुलीच्या मनाप्रमाणें घडली नाहीं, म्हणून कालिदासावर चंद्रगुप्ताची इतराजी होऊन त्यास कांही काळ निर्वासित स्थितींत रहावें लागलें असावें. रामायणांतील संदेश-कल्पना व स्वतःचा विरहावस्थेचा अनुभव या आधारांवर हें हृदयंगम काव्य कालिदासानें रचिलें असावें, असें मला वाटतें. या लहानशा आधारांवर कालिदासाने जें हें सुंदर काव्य केलें आहे, त्यास उपमाच द्यावयाची, तर कैलास-लेण्याची देतां येईल. ती अद्‌भुत शिल्पकृति निर्माण करणाऱ्यानें इतर लेणीं पाहिलीं असतील, पण एकाच खडकांतून कैलासासारखें भव्यदिव्य लेणें निर्माण करण्याची कल्पना ज्या शिल्पकारास सुचली व ती कृतींत उतरविण्याच्या कामीं जें बुद्धिवैभव व जें कलाचातुर्य त्यानें दाखविलें आहे, त्याचें कौतुक करावें तेवढें थोडेंच.

मेघदूत काव्य रचण्यांत कांहीं एक उदात्त हेतु असावा, असें मला वाटतें. नुसतें स्वतःच्या विरहावस्थेचें वर्णन करण्याकरितां कालिदासानें आपली काव्य-शक्ति खर्चिली नसावी. प्रतिभावान् कवि अगर ग्रंथकार कोणत्या तरी उच्च ध्येयानें प्रेरित झाल्याशिवाय आपली प्रज्ञा शिणवीत नाहीं, असें मला वाटतें व तसें उच्च ध्येय असल्याशिवाय वाङमय-कृतीला लोकप्रियता व दीर्घायुष्यहि लाभत नाहींत. मेघदूताचें मागें असें कोणतें ध्येय असावें ?

याचें उत्तर कालिदासानें आपल्या काव्यनाटकांत जीं स्त्री-स्वभावचित्रें वर्णिलीं आहेत, त्यांत सांपडतें. रघुवंशांत सीतेचें, कुमारसंभवामध्यें पार्वतीचें व शाकुंतलांत शकुंतलेचें आणि मेघदूतांत यक्षपत्नीचें वर्णन आहे. याशिवाय प्रसंगानुरूप अनेक विविध अवस्थांतील स्त्रियांचीं शब्दचित्रें कालिदासानें आपल्या दिव्य प्रतिभेनें रेखाटलीं आहेत. त्यांवरून एक गोष्ट स्पष्ट होते कीं, तो स्त्रियांचा फार चाहता होता व त्याचें स्त्रीदाक्षिण्यहि श्रेष्ठ दर्जाचें होतें.

'स्थानं नास्ति रहो नास्ति नास्ति प्रार्थयिता नरः
तेन नारद नारीणां सतीत्वमुपजायते ।'

या पौराणिक अधिक्षेपोक्तीनें व पंचतंत्रादिकांत वारंवार आढळणाऱ्या स्त्री-स्वभावांतील चांचल्यादि अवगुणांच्या वर्णनानें कालिदासाचें स्त्रीदाक्षिण्य चळलेलें नाहीं. " आपद्यपि सतीवृत्तं न मुञ्चति कुलस्त्रियः ", " अचिन्त्यं शीलगुप्तानां चरितं कुलयोषिताम् " या विचारसरणीचा तो आहे. स्त्री ही आदिमातेची प्रतिमा असून तिचें साहाय्यानें मानवांस आपली जीवित-यात्रा सुखानें पार पाडतां येतें व संसारांत राहूनहि परमार्थ साधतां येतो, असें उत्कटतेनें मानणारा तो आहे. मातृप्रेमाची महति सर्वत्र गायिली आहे, पण मातृप्रेमापेक्षां व्यापक व उत्कट असें हें स्त्रीपुरुषांचें परस्पर प्रेम आहे, हें विचारान्तीं सहज पटणारें आहे. " हतमपि निहन्त्येव मदनः " या भर्तृहरीच्या सुप्रसिद्ध उक्तींत मदनाच्या साम्राज्याचें विश्वव्यापित्व व त्याची प्राणिमात्रांवरील अमर्याद सत्ता वर्णिलीं आहेत. मानवसमाजांतील या अनंग-साम्राज्यांत विवाहसंस्थेनें स्थैर्य व पावित्र्य आणलें आहे व समाजधारणेस तीं दोन्ही अत्यावश्यक असें कालिदासाचें स्पष्ट मत होतें, असें त्याचे ग्रंथ वाचणारांत सहज प्रतीत होईल. कालिदास हा दरबारी कवि होता. सर्व तऱ्हेचीं सुखें त्यास सहजसाध्य. शृंगार रसाचा तो सर्वश्रेष्ठ कवि. तेव्हां विवाहसंस्थेविषयीं त्याचें मत वरीलप्रमाणें होतें, ही महत्त्वाची गोष्ट आहे. विवाहरज्जूनें एकदां बद्ध झाल्यावर पतिपत्नीनीं परस्परांशीं आमरण एक-निष्ठ राहावें व कशाहि बिकट प्रसंगीं निष्ठा ढळूं देऊं नये, हें त्या संस्थेचें पावित्र्य मानलें म्हणजे मग क्रमप्राप्तच असतें. प्रत्यक्षांत ती पाळणें ही तपस्या आहे, हें उघडच आहे. कोठें पति पत्नीशीं एकनिष्ठ, कोठें पत्नी तशी, तर बऱ्याच ठिकाणीं केवळ परंपरागत कल्पनांमुळें बाह्यतः व सामाजिक बंधनांमुळें एकनिष्ठ मनामनानें अन्यथा अशाच दंपतींचीं उदाहरणें जगांत आपणांस बरींच दिसतात. म्हणूनच एका कवीनें म्हटलें आहे—

' अभीष्टा कस्यचित् कान्ता कान्तः कस्याश्चिदीप्सितः
परस्परानुरागाढ्यं दांपत्यमति दुर्लभम् । '

कालिदासास अशा परस्परानुरागाढ्य दंपतीचें चित्र रेखाटावयाचें होतें,

म्हणून त्यानें मेघदूत रचिलें असावें, असें मला वाटतें. संकटांशिवाय सद्-गुणांची परीक्षा होत नाहीं, म्हणून कालिदासानें यक्षास शापांकित करून दूरदेशीं पाठविलें आहे. मेघदूताचा नायक म्हणून यक्षास निवडण्यांत कालि-दासानें फार चातुर्य दाखविलें आहे. राम-सीता, शिव-पार्वती या देवता, तेव्हां त्यांच्यांत आदर्श गुण आढळले, तर आश्चर्य वाटण्यासारखें नाहीं, असें सामान्य लोक मानणार. राजकवि या नात्यानें कालिदासाचा अनेक राजे-रजवाडे व धनिक यांचेशीं संबंध आला असला पाहिजे. अशा लोकांत त्यास कोणी योग्य नायक दिसला नसला पाहिजे किंवा रांजास अगर धनिकास आपल्या काव्याचा नायक करण्याची कल्पना त्यास पसंत नसावी. राजेलोक व धनिक हे लहरी व नोकरांविषयीं योग्य सहानुभूति नसणारेच जास्त. ' लक्ष्मीवन्तो न जानन्ति प्रायेण परवेदनाम् ', ' अधिकारान्धमनसां विचार-सहता कुतः– ' या उक्ति लागू पडणारेच त्या वर्गांत फार. देव व मानव यांमध्यें संस्कृत कवींनीं अनेक योनि कल्पिल्या आहेत. या यक्षगंधर्वसिद्ध-किन्नरादि योनींत यक्ष हे हुषार, विलासी व राज्यकार्यपटु. अवघड प्रश्नांस यक्षप्रश्न म्हणतात. तेव्हां तरुण, बुद्धिमान्, ऐश्वर्यसंपन्न अशा यक्षाची नायक म्हणून कालिदासानें योजना केली असावी. त्याची पत्नी रूपवती, हौशी, गृहकृत्यदक्ष, कलावती व ईश्वरभक्तिशील अशी दाखविली आहे. सर्व धनि-कांचा राजा कुबेर याचा शाप मग यक्षास होणें हें क्रमप्राप्तच ! अलका नगरीचें ऐश्वर्य व तेथील यक्षांचें विलासी जीवन या पार्श्वभूमीवर यक्षपति-पत्नीचे स्वभावविशेष कवीनें वर्णिले आहेत. ऐन तारुण्यांत सर्व सुखसाधनें जवळ असतां व आजूबाजूचे लोक ऐष आरामांत काळ घालवीत असतां यक्ष-पत्नी पतीशीं कशी व किती एकनिष्ठ राहिली, हें कालिदासानें दाखविलें आहे. शापाचा काळ काढण्याकरितां यक्ष पवित्र असें रामगिरीचें एकांत स्थळ पसंत करतो व तेथें प्रत्यहीं झुरत असतो, यांत त्याची निष्ठा दिसून येते. असें हें दिव्य दंपतीप्रेम मेघदूताचें अधिष्ठान आहे. तें कालिदासानें आपल्या दिव्य प्रतिभेनें वर्णिलें आहे व जातां जातां धनिकांस व अधिकारमदांधांस टोला दिला आहे.

कालिदास हा महान् शिवभक्त होता. भर्तृहरीनें निर्मळ गुणांचें वर्णन

एका श्लोकांत दिलें आहे, त्यांत ' भक्तिः शूलिनि ' हा एक गुण आहे. कालिदासानें शिव-पार्वतीवर कुमारसंभव रचावें व पतिपत्नीच्या दिव्य प्रेमावर मेघदूत रचावें व त्यांत धन्यता मानावी, हें मला साहजिक वाटतें. मेघदूताकडे पाहण्याची माझी दृष्टि वरील प्रकारची आहे व बहुतेकांची तीच असेल, निदान असावी असें मला वाटतें.

कालिदासादि बहुतेक प्राचीन कवि राजाश्रयी होते. शृंगाररस वर्णन करण्यांत कालिदास सर्वश्रेष्ठ. यक्ष तरुण, विरहतप्त व विमनस्क, तेव्हां त्याच्या तोंडीं एकादादुसरा उत्कट शृंगारात्मक शब्द यावा, यांत अनुचित असें फारसें कांहीं नाहीं, हें उघड आहे.

पूर्व मेघांत सृष्टिवर्णनपर श्लोकांनीं पुष्कळच जागा व्यापिली आहे. अतएव तो भाग किंचित अप्रस्तुत असेंहि कांहीं मानतात. कवि हे निरंकुश असतात. सामान्य लोकांस वाटणारीं बंधनें ते मानीत नाहींत काव्यनिर्मितीचा आनंद उपभोगणें व त्यांत रसिकांस सहभागी करणें, हें त्यांचें काम. केवळ तर्काधिष्टित विचारसरणीनें मेघदूताकडे पाहूं लागलों, तर ' मूले कुठारः ' प्रमाणें होईल. मेघाकडून संदेश पाठविण्याची कल्पनाच मुळीं हास्यास्पद, असें मग म्हणतां येईल. मेघास दूत करण्याचें यक्षानें ठरविल्यावर साहजिकच त्यास अलकेपर्यंत सोईस्कर मार्ग सांगणें व दीर्घ प्रवासांत तो थकून जाणार नाहीं व कंटाळा करून अंगीकृत कार्य मध्येंच सोडणार नाहीं, म्हणून त्याचा मार्ग प्रसिद्ध शहरांवरून, नद्यांवरून, पवित्र क्षेत्रांवरून नेला आहे. कवीचें निसर्गप्रेम व त्याचा उज्जयिनीचे परिसरावरचा लोभ लक्षांत घेतां मेघास कवीनें तिकडे नेऊन महाकालेश्वराचें त्यास दर्शन घडविणें, हें सहज समजतें. पूर्व मेघांतील बरेचसे श्लोक जरी सकृद्दर्शनीं केवळ सृष्टिवर्णनपर वाटतात, तरी त्या बहुतेकांत कालिदास यक्षाच्या विरही मनःस्थितीचें दर्शन घडवीत आहे. जेथें जेथें कालिदासास संधि मिळते, तेथें तेथें आपली शिव-भक्ति प्रकट केल्याशिवाय तो पुढें जात नाहीं. मेघदूताचें अधिष्ठान उज्ज्वल दंपतीप्रेम व रस विप्रलंभशृंगार. नायक-नायिकेच्या विरहावस्थेंतील परस्पर चिंतनानें हा रस निर्माण होतो. त्या चिंतनांतहि एक प्रकारचें सुख असतें. ' प्राप्तानि दुःखान्यपि दण्डकेषु सचिन्त्यमानानि सुखान्यभूवन् ' हें भवभूतीचें

सर्मांच्या तोंडचें वाक्य या वेळीं आठवतें. संयोगांतील शृंगारापेक्षांहि कालिदासास विप्रलंभशृंगाराचें आकर्षण जास्त. भगवद्गीतेंत बुद्धिग्राह्य व अतींद्रिय सुख श्रेष्ठ प्रतीचें मानलें आहे. गाढ दंपतीप्रेमांत अशा प्रकारचें अतींद्रिय सुख परस्पर चिंतनांत वाटत असलें पाहिजे. मेघास प्रवासांत नद्या, पर्वत लागतात; हंस, सारस, मयूर पक्षी दिसतात; विदिशा नगरीजवळचा क्रीडापर्वत; विदिशा, उज्जयिनी, दशपूर यांसारखीं वैभवसंपन्न शहरें लागतात; महाकालेश्वर, ब्रह्मावर्त, कनखल यांसारखीं पवित्र स्थळें लागतात. या सर्वांचें वर्णन करितांना यक्षास खचितच अलका नगरी, तिचें वैभव, स्वतःचा क्रीडापर्वत, शंकराचा निवास, मंदाकिनी नदी हीं सर्व आठवत असलीं पाहिजेत व त्या त्या ठिकाणीं पत्नीसमवेत आपण उपभोगलेलीं सुखें त्याच्या डोळ्यांसमोर उभी राहिलीं असणारच. शंकर-पार्वतीस कैलास पर्वतावर फिरतांना पाहून यक्ष मेघास घनरूप होऊन जिन्यासारखा होण्यास सांगतो, त्यांत कालिदासाची उत्कट शिव-पार्वतीभक्ति तर दिसूत येतेच, पण यक्षाचें पूर्वावस्थेंतील स्वसुखाचें चिंतनहि प्रतीत होतें. अशा दृष्टीनें पूर्व मेघाकडे पाहिलें, तर त्यांतील सृष्टिवर्णनपर श्लोक अप्रस्तुत वाटणार नाहींत, असें मला वाटतें.

असें हें मेघदूत काव्य आहे. रसिक वाचक त्याचें यथामति रसग्रहण करतीलच.

मेघदूताचीं भाषांतरें मराठींत अनेक झालीं आहेत. मी माझें भाषांतर करण्यास १९४४ च्या जूनमध्यें सुरुवात करून तें १९४५ च्या मे महिन्यांत पुरें केलें. संस्कृतची आवड मला विद्यार्थीदशेंत उत्पन्न झाली व ती आजतागायत राहिली आहे मेघदूताचें भाषांतर करण्याची कल्पना १९४३ सालीं भारताचे विद्यमान् अर्थमंत्री श्री. चिं. द्वा. देशमुख रिझर्व्ह बँकेचे पहिले हिंदी गव्हर्नर झाले, तेव्हां त्यांचें अभिनंदनपर जे लेख वर्तमानपत्रांत आले, ते वाचल्यानें आली. कोणत्या तरी वर्तमानपत्रांत त्यांनीं मेघदूताचें भाषांतर केल्याचा उल्लेख होता. मी हायस्कूलांत शिकत असतांना [१९१३ ते १९१८] श्री. देशमुखांचें विद्यार्थीदशेंतील अद्वितीय यश ऐकतच होतों आणि आमचे राजाराम हायस्कूलांतील शिक्षक त्यांचा आदर्श आमचेपुढें ठेवीत. 'सुश्लोक-मेघ'कर्ते डॉ. श्रीखंडे हे माझे बालमित्र. त्यांचा संस्कृतचा व्यासंग थोर व ते

मेघदूताचें भाषांतर करीत असावेत, अशी कल्पना मला त्यांच्या टेबलावर श्री. बोरवणकर यांचें सटीक मेघदूत पाहिल्यामुळें आली. तेव्हां जमल्यास आपणहि भाषांतर करावें, अशी माझे मनांत ऊर्मि आली. भाषांतर करण्याचें ठरविल्यावर मी कोणतेंहि भाषांतर न पाहण्याचें ठरविलें व निर्णयसागरची मेघदूत प्रत मागवून त्यावरून भाषांतर करण्यास सुरुवात केली. त्यावेळीं मला फक्त कृष्णशास्त्री चिपळूणकरांचें व श्री. देशमुखांचें अशीं दोनच भाषांतरें असल्याचें माहित होतें. पहाण्यांत मात्र एकहि नव्हतें. माझें भाषांतर १९४५ जूनमध्यें डॉ. श्रीखंडे यांस मुंबईंत दाखविण्याचा योग आला व त्यांनीं पुढें २-३ महिन्यांनीं आपला लेखी अभिप्राय कळविला. त्यावरून माझें भाषांतर बरें झालें आहे असें मानण्यास मला जागा झाली.

अनेक कारणांमुळें नोकरीचे मुदतींत भाषांतर प्रसिद्ध न करण्याचें मी ठरविलें होतें. त्यामुळें तें १९५४ च्या मे महिन्यांत मी सेवानिवृत्त होईपर्यंत जवळजवळ तसेंच ठेवून दिलें होतें. डॉ. श्रीखंडे यांचेनंतर तें श्री. पु. म. लाड व कै. न्यायमूर्ती ग. स. राजाध्यक्ष यांनीं १९४६ व १९४७ मध्यें पाहिलें. न्यायमूर्ती राजाध्यक्ष हे माझे पहिले डिस्ट्रिक्ट जज्ज. १९२६ साली ते साताऱ्यास डि. जज्ज असतांना मी वकील होतों मी भाषांतर केल्याचें त्यांस सांगितलें, तेव्हां त्यांनीं आस्थापूर्वक चौकशी करून तें पाहण्याची इच्छा दर्शविली. म्हणून मी हस्तलिखित प्रत करून १९४७ सालीं त्यांस दिली. ती अद्यापि त्यांच्या संग्रहीं असावी. जेव्हां जेव्हां त्यांची गांठ पडे, तेव्हां तेव्हां ते त्यासंबंधीं विचारपूस करीत. त्यांनींच मला श्री देशमुख यांची प्रत पाठविली. आज माझें प्रसिद्ध होणारें भाषांतर पाहण्यास ते हयात नाहींत, याचा मला फार हळहळ वाटते. त्यांचा थोरपणा अनेकांनीं वर्णिला आहे, मीहि अनेक वेळां तो अनुभवला आहे. असो. आणखी कांहीं मित्रांनीं आणि आप्तांनी माझा अनुवाद वाचून पाहिला आहे व आपली गुणग्राहकता दर्शविली आहे. न्यायाधीश या नात्यानें माझा अनेकांशीं संबंध येत असे. १९५० सालीं डॉ. श्रीखंडे यांनीं आपला ' सुश्लोकमेघ ' प्रसिद्ध केला. त्यांत त्यांनीं पूर्वीचे सर्व प्रसिद्ध-अप्रसिद्ध भाषांतरांचा उल्लेख करून प्रत्येकांतील एकेका श्लोकाची गुणदोषात्मक चर्चाहि केली आहे. या त्यांच्या उल्लेखामुळें माझें

भाषांतराबाबत मला त्यावेळीं जरूर नसलेली प्रसिद्धी मिळाली. भाषांतर न वाचतांच कृष्णशास्त्र्यांचे नंतर पुनः भाषांतराची जरूरच काय ? व इतके दिवस ठेवून दिलें, तेव्हां आतां प्रसिद्धच कशाला करतां, असे अनुदार उद्‌गार काढणारेंहि कांहीं भेटले. लेखकास आपलें पुस्तक प्रसिद्ध व्हावें, असें साहजिकच वाटतें. त्याप्रमाणें मी माझा अनुवाद शक्यतों सुधारून प्रसिद्ध करण्याचें ठरविलें.

भाषांतर करितांना समवृत्त-समश्लोकीशिवाय अन्य प्रकारचें करावें, असें मला कधींच वाटलें नाहीं. भाषांतर सुलभ व्हावें व त्यांत मूळ मेघदूताचे प्रसाद, नादमाधुर्यादि गुण शक्यतों उतरावेत, ही महत्त्वाकांक्षा होती. संस्कृत काव्यांचे भाषातरांस दोन प्रकारचा वाचकवर्ग असणार. एक संस्कृत न जाणणारा परंतु आपल्या संस्कृतीचे उत्तमोत्तम ग्रंथ त्या भाषेंत आहेत व मराठीवर तिचें अक्षय ऋण आहे, म्हणून त्या भाषेंतील उत्तम ग्रंथांचा भाषांतरद्वारें कां होईना, परिचय व्हावा अशी इच्छा असणारा सुविद्य मराठी वाचकवर्ग. दुसरा वर्ग म्हणजे संस्कृत उत्तम जाणणारा व ज्याची मातृभाषा मराठी आहे असा. या वर्गांतील वाचक मूळ मेघदूताचा काव्यानंद घेऊं शकतात; पण त्यांनाहि मातृभाषेवरील स्वाभाविक प्रेमामुळें संस्कृतांतील उत्तम वाङमय-कृतीचें मराठींत रूपांतर व्हावें असें वाटणारच. पहिल्या वर्गांतील वाचक साधारणपणें मराटींत काव्य कसें उतरलें आहे, हें पाहणार. त्यांच्या दृष्टीनें मूळांतील एकादादुसरा शब्द राहिला, पण त्याची भरपाई जर प्रसादयुक्त श्रुतिमनोहर मराठी काव्यानें आली, तर ती फारशी विचारांत घेण्यासारखीं उणीव नसणार. दुसऱ्या वर्गांतील वाचकांच्या मात्र चुकीचा अर्थ, महत्त्वाचे शब्द गाळणें वगैरे दोष सहज लक्षांत येणार. संस्कृतसारख्या समासप्रचुर, विशिष्ट कविसंकेत असलेल्या भाषेंतील सर्वश्रेष्ठ कलाकृतीचें इतक्या शतकांनंतर मराठी वाचकांस सहज समजेल, असें भाषांतर करणें हो परमदुर्घट गोष्ट आहे, हें सर्वमान्य आहे. मी माझें भाषांतर दोन्हीहि वाचकवर्ग दृष्टि समोर ठेवून केलें आहे.

सेवानिवृत्तीनंतर मी श्री. देवस्थळीचेंशिवाय सर्व प्रसिद्ध झालेलीं भाषांतरें वाचलीं. 'विद्युल्लता' व 'सुमनोरमणी' या टीका डॉ. श्रीखंडे यांनीं

दिल्या, त्या वाचल्या. पूर्वीचीं भाषांतरें वाचीत असतांना माझें भाषांतर सुधारण्याच्या दृष्टीनें अनेक उद्‌बोधक गोष्टींचा लाभ झाला. कृष्णशास्त्र्यांच्या भाषांतरांतहि अर्थाच्या कांही ढोबळ चुका, मूळ कल्पनांचा विपर्यास व मराठी वाचकांस सहजपणें न समजतील, असे कांहीं शब्दप्रयोग आढळले. सॉलिसीटर सबनीस व दामले यांना प्रत्येक पानावर दुर्बोध शब्दांच्या अनेक टीपा देणें जरूर वाटलें. येथें इतर भाषांतरांचे दोष दाखविण्याचा हेतु नाहीं. मी बहुतेक भाषांतरांचा चिकित्सापूर्वक अभ्यास करून एक लेखहि तयार केलेला आहे. माझें भाषांतर शक्यतों मूळाशीं धरून राहावें व त्यांत कालिदासाचे प्रमुख गुण- प्रसाद, माधुर्य व अल्पाक्षररमणीयत्व हे- शक्यतों यावेत यांचा कसोशीनें प्रयत्न केला आहे. समवृत्त-समश्लोकी भाषांतर करतांना मग मूळांतील एखादादुसरा शब्द निरुपायास्तव गाळावा लागला आहे. असे गाळलेले शब्द प्राय: विशेषणात्मक स्वरूपाचे असावेत. संस्कृत कवि 'किसलय' हा शब्द, ओष्ठ, कर यांचा नाजूकपणा वर्णन करितांना योजितात. मराठी भाषांतर करितांना या किसलय शब्दाचें भाषांतर प्रत्येक वेळीं आलेंच पाहिजे, असें मला वाटत नाहीं. उत्तर मेघांत २८ व्या श्लोकांत 'नि:श्वासोनाधरकिसलय क्लेशिना विक्षिपन्तीं' असा पहिला चरण आहे, याचें 'सुश्लोकमेघ'कर्त्यांनीं 'ओष्ठांचिया कोमल पल्लवांसी निःश्वास जे पीडिति हालवीती' असें भाषांतर केलें आहे. हा इतका शब्दशः भाषांतर करण्याचा चोखंदळपणा माझ्या भाषांतरांत आढळणार नाहीं, हें मी प्रांजळपणें कबूल करतों. कालिदासाची मूळ कल्पना शक्यतों सुबोध व मराठी वळणाशीं धरून वर्णन करावी, ही दृष्टि मी ठेवली आहे. आणखी एक उदाहरण देऊन मी माझा दृष्टिकोन स्पष्ट करतों. संस्कृतमध्यें 'लोचनैः पीयमान:' (पूर्व मेघ १६) असें आहे. तसेंच 'पात्रीकुर्वन् दशपुरवधूनेत्रकौतूहलानाम्' असें पूर्व मेघ ४७ मध्यें आहे. याचें डॉ. श्रीखंडे यांनी 'सुस्निग्धनेत्रीं पिति अन्नदात्या' व 'विलासिनींच्या मधुरां कटाक्षां सकौतुकां पात्र कर स्वतःसी' असें भाषांतर केलें आहे. मला अशा तऱ्हेच्या मराठी-भाषाप्रयोगांत कृत्रिमता वाटते. सुलभ प्रसादयुक्त रचना व क्वचित् मूळांतील एकादा शब्द गाळणें, यांपैकीं कोणतें पसंत करावें, असा प्रश्न पडत असे, त्यावेळीं मी बहुधा पहिला पर्याय स्वीकारून भाषांतर केलें आहे. वामनपंडित हे आद्य सुश्लोककार.

' प्रीणाति यं सुचरितैः पितरं स पुत्रः ' याचें ' जो तोषवी स्वजनकास सुपुत्र तोच ' असें त्याचें भाषांतर आहे. यांत ' सुचरितैः ' या पदाचें भाषांतर नाहीं हें पद वगळणें योग्य होतें, असें मी म्हणत नाहीं. पण भाषांतर कर-तांना पाळाव्या लागणाऱ्या अनेक बंधनांमुळें अनेक वेळां कांहीं कांहीं राहून जातें, एवढेंच दाखविण्याचा हेतु आहे. जास्त शब्द घालून पाल्हाळिकपणाचा दोष येतो, तो कसा, किती व कोठें आला आहे हें दाखविणें उद्‌बोधक होणारें असलें, तरी विस्तारभयास्तव मला तें दाखवितां येत नाहीं. चिकि-त्सक वाचकवर्ग मी स्वीकारलेला दृष्टिकोन लक्षांत घेऊनच माझ्या भाषां-तराचें मूल्यमापन करतील, असा भरंवसा आहे.

हा विषय पुरा करण्यापूर्वीं मेघदूतांतील एका श्लोकाच्या भाषांतरा-संबंधीं खुलासा करणें जरूर वाटतें. पूर्व मेघांतील २१ व्या श्लोकामध्यें ' सारंगास्ते जललवमुचः सूचयिष्यति मार्गम् ' असा चवथा चरण आहे. मल्लिनाथानें आपल्या टीकेंत सारंग शब्दाचे तीन अर्थ (भृंग, हरिण व गज) धरून पहिल्या तीन चरणाचा अर्थ लावला आहे. श्री. पंडित यांनीं 'चातक' हाहि अर्थ सारंग शब्दावर बसविला आहे. डॉ. श्रीखंडे म्हणतात, " पण अनुवादकास कांहींतरी निश्चित करूनच मार्गक्रमण करावें लागणार, हें विसरून चालणार नाहीं. " सारंग शब्दावर किती अर्थ बसवावयाचे, हा भाग सोडला तरी 'जललवमुचः' या पदाचा खरा अर्थ काय, हा फार महत्त्वाचा प्रश्न आहे. मल्लिनाथ " यत्र यत्र वृष्टिकार्यं कन्दलीमुकलनीपकुसुमादिकं दृश्यते, तत्र तत्र त्वया वृष्टमित्यनुमीयते इति भावः " अशी टीका देतो. पूर्णसरस्वतीच्या 'विद्युल्लता' या टीकेचा अतिशय गौरवानें डॉ. श्रीखंडे यांनीं आपल्या 'अवतरणिकें'त उल्लेख केला आहे. त्यांत 'जललवमुचः' यावर 'लोकसुखानुराधेन शनैःशनैः वर्षतः ' अशी टीका आहे. ' तव मार्गातें मनीं तर्कतिल हर्षित वनीं कुरंग ' हें सारंग शब्दाचा एकच अर्थ धरून कृष्णशास्त्री यांनीं केलेलें भाषांतर आहे. ' भृंगां, कुरंगां, वनिच्या मतंगां परोक्ष गेलासि जरी गळोनी ' हा डॉ. श्रीखंडे यांच्या भाषांतराचा चवथा चरण व त्यामागें तिसऱ्या चरणांत ' आस्वादुनी त्वत्पथ ये कळोनी ' असें आहे. रानकेळी या पावसाळा सुरू होण्यापूर्वींच उगवतात, वाढतात. कंद असणाऱ्या वनस्पति

या नुसत्या मेघगर्जनेनें मूळांतून बाहेर पडतात, असा उल्लेख पूर्व मेघ श्लो. ११ मध्यें आहे. अशा वनस्पतींच्या वाढीस प्रत्यक्ष पावसाची जरूर नसते. नीपवृक्षाचीं फुलें मेघसंपर्कानें फुलतात, हें पूर्व मेघ २५ व्या श्लोकांतील ' त्वत्संपर्कात् पुलकितमिव प्रौढपुष्पैः कदम्बैः ' या चरणानें स्पष्ट होणारें आहे. उत्तर मेघांत नीपवृक्षाचे फुलास उद्देशून ' त्वदुपगमजं ' म्हणजे मेघ आकाशांत येण्याच्या समयास येणारें असें पद आहे. २१ व्या श्लोकांत भृंग अर्धोन्मीलित नीपवृक्षाचीं फुलें पाहून पुढें जातात, असें पहिल्या चरणांत आहे. याचा अर्थ त्यांत मध नसणार हें उघड आहे. वाढलेल्या रानकेळी, नीपवृक्षांची अर्धस्फुटित फुलें व अरण्यांतील भू-सुवास हीं प्रत्यक्ष पाऊस पडल्याचीं चिन्हें नसून पावसाळा जवळ आल्याचीं चिन्हें आहेत. भू-सुवास हा किरातादि वन्य लोकांनीं उकरलेल्या अगर नांगरलेल्या भूमींतून निघणारा सुवास असू शकेल. ' सद्यःसीरोत्कषणसुरभि ' या १६ व्या श्लोकांतील पदानें भू-सुवास येण्यास प्रत्यक्ष पावसाची जरूर दिसत नाहीं. तेव्हां मेघांतून पाणी गळण्यापूर्वीच अर्धस्फुटित नीपपुष्पें, रानकेळी व भू-सुवास ही विंध्याटवीत असणार व त्या अनुरोधानें भृंग, हरिण व गज तेथें येणार. या प्राण्यांनीं मेघाशिवाय अन्य इतर कोणास मार्ग सुचवावयाचा होता किंवा मेघास हळूहळू पाणी टाकीत विंध्याटवींतून जातांना लोकानुग्रह करावयाचा होता. हे अर्थ मला विशेष रोचक वाटत नाहींत. यक्षास मेघाच्या सुखरूप प्रवासाची काळजी होती. म्हणून त्यास चातकाच्या शब्दाचा शुभशकून आरंभीं घडविला आहे. १९ व्या श्लोकांत मेघ विंध्य पर्वताचे पायथ्याशीं पोचल्याचें दाखविलें आहे. तेथून घोर अशी विंध्याटवी लागते व त्यांतून मेघाचा प्रवास होणार. अशा अरण्यांतून जातांना वाट चुकण्याचा संभव फार. शिवाय अरण्यांत जागजागीं वणवे आढळणार व परोपकारी मेघास ते शमवितांना वृष्टि करावी लागणारच. तेव्हां वाट चुकूं नये व सामर्थ्य खर्च होऊं नये, म्हणून यक्ष मेघास ' जललवमुचः ' या पदानें हळूहळू जाण्यास सुचवीत आहे. पावसाळी मेघ म्हणून अजिबात थेंबहि न गाळतां जाणें हेंहि त्यास अशक्यच. भृंग, हरिण व गज हे तुला मार्ग दाखवितील, असें सांगण्यांत समर्पकता दिसते. मेघांचा एक विशिष्ट मार्ग असतोच. घोर अरण्यांतहि कांहीं पायवाटा असतातच. हरिण,

भृंग, हत्ती वगैरे प्राणी वाटेंत दिसले, म्हणजे मेघास आपण मार्ग चुकलों नाहीं, याची खात्री वाटेल. कारण हे प्राणी जेथें आसपास पाणी असेल, अशा ठिकाणींच असणार. या सगळया गोष्टी लक्षांत घेऊन मी माझें भाषांतर केलें आहे. तें चूक किंवा बरोबर हें तज्ज्ञांनीं ठरवावें. भाषांतरांतील दोषांकडे रसिक वाचक सहानुभूतीनें पाहतील, अशी अपेक्षा आहे.

मी अनेक ठिकाणीं विभक्तिप्रत्ययांत यमक वापरलें काहे. " कृशे कवित्वेऽपि जनाः कृतश्रमाः विदग्धगोष्टीषु विहर्तुमीशते " या वर्गीतील मी एक कवि आहे. वापरल्या जाणाऱ्या यमकानें मराठी काव्यास माधुर्य येतें, असें मी मानतों. पण दागिन्यांनीं शोभा येते, म्हणून जशा हल्लीच्या स्त्रिया फुकट दिले, तरी पूर्वीचे मौल्यवान् पण बोजड दागिने वापरण्यास तयार होणार नाहींत, त्याप्रमाणें केवळ यमक चांगलें साधावें म्हणून अर्थाची ओढाताण व दुर्बोधता निर्माण करणें मला मुळींच आवडत नाहीं. विभक्तिप्रत्ययांत यमक कल्चर मोती किंवा नकली हिऱ्याप्रमाणें आहे. सधन लोकहि जर कल्चर मोती व नकली हिरे पसंत करतात, तर बदलत्या काळास व रूचीस अनुसरून विभक्तिप्रत्ययांत यमकें प्रसंगविशेषीं वापरण्यास प्रत्यवाय नसावा असें मी मानतों.

भाषांतर सुधारण्याच्या कामीं मी संस्कृत टीका, पूर्वीचीं भाषांतरें व मनन यांचाच सर्वस्वीं आधार घेतला आहे. सुप्रसिद्ध गुजराथी मेघदूतानुवादकार श्री. **कीकाभाई घनःश्याम** हे प्रत्येक श्लोकाच्या अनुवादाची चरणवार अनेक मित्रांशीं चर्चा करीत, असा उल्लेख त्यांनीं प्रस्तावनेंत केला आहे. मला तो मार्ग स्वीकारण्यास वेळहि नव्हता व संधिहि नव्हती. मतभेद झाला कीं वादविवादाचा प्रसंग येतो व त्यांतून अनेक वेळां कटुता निर्माण होण्याचा संभव फार. मला असे वादविवाद मुळींच रुचत नाहींत म्हणून मी अनुवादासंबंधीं चर्चा अशी कोणाजवळ केलेलीच नाहीं. प्रसंगविशेषीं मित्रांनीं केलेल्या सूचनांचा अवश्य विचार केला आहे.

डॉ. श्रीखंडे यांनीं मला जरूर लागणारीं पूर्वीचीं भाषांतरें व दोन संस्कृत टीका वाचावयास देऊन उपकृत केले आहे. त्यांनीं १९४५ सालीं

माझें हस्तलिखित वाचलें, तेव्हां त्यावर कांहीं सूचनाहि केल्या आहेत. त्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे. पुण्याचे संस्कृतचे व्यासंगी व माझे मित्र डॉ ग. वि. देसाई, डॉ. के. ना. वाटवे, प्रा. माटे, धुळयाचे सरकारी वकील श्री. मुधोळकर, श्री. नित्सुरे मास्तर, सेवानिवृत्त कोर्टांतील नोकर व संस्कृतचे गाढ व्यासंगी श्रीयुत शास्त्री, नाशिकला असतांना परिचित झालेले सेवानिवृत्त डे. ए. इन्स्पेक्टर श्री रेगे, फलटणचे माजी दिवाण श्री गोडबोले, डिस्ट्रिक्ट जज्ज नागेशराव थोरवडे, हायकोर्ट रजिस्ट्रार श्री. नाईक यांच्या वाचनांत हा अनुवाद आलेला आहे व त्यांनीं दर्शविलेल्या गुणग्राहकतेबद्दल आभार मानणें उचितच आहे. साताऱ्याचे श्री. बाळकृष्ण गणेश चांदोरकर यांच्याकडून कृष्णशास्त्र्यांची 'पद्यरत्नावलि' व बेळगांवचे संस्कृतचे रसिक वयोवृद्ध व्यासंगी दि. ब. चौगुले यांच्याकडून 'पार्श्वाभ्युदयम्' हीं पुस्तकें मिळाल्याबद्दल त्यांचाहि मी आभारी आहे.

नाशिक येथें असतांना पूज्य शंकराचार्य कूर्तकोटी यांच्याशीं निकटचा परिचय होण्याची संधि मिळाली व त्यांनींहि अनुवाद वाचून उत्तेजनपर उद्गार काढले, त्याबद्दल कृतज्ञता व्यक्त करतों. महाराष्ट्र साहित्य संमेलनाचे अध्यक्ष तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांचा माझा परिचय अनेक वर्षांपासून आहे. त्यांनीं अलिकडे अनुवाद समग्र वाचून अभिप्राय दिला, त्याबद्दल त्यांचा ऋणी आहे. अनेक कार्यांचा व्याप मागें असतांना व पूर्व परिचय व प्रकृति विशेष बरी नसतांनाहि प्रा. रा. श्री. जोग यांनीं परिश्रम घेऊन वेळेवर पुरस्कारात्मक लेख लिहून दिल्याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहे.

मुखपृष्ठावरील चित्र माझी सुविद्य स्नुषा चि. सौ. नलिनी हिनें हौशीनें काढलें आहे, त्याबद्दल तिचे अभिनंदन करतों.

बेळगांव येथील 'श्री मुद्रणालया' चे उत्साही मालक श्री. गुर्जर बंधु यांनीं छपाईचें काम तत्परतेनें व मनासारखें करून दिल्याबद्दल त्यांचे आभार मानलेच पहिजेत.

मुद्रणदोष कांहीं राहून गेलेच आहेत, त्याबद्दल वाचकांनीं क्षमा

करावी. आणखी कोणाचे आभार मानण्याचें राहून गेलें असल्यास त्यांनीं उदारपणानें क्षमा करावी. नजिकच्या आप्तांचे आभार जाहीर रीतीनें मानण्याची जरूर दिसत नाहीं.

हल्लीं लोकांमध्यें संस्कृतबद्दल आस्था वाढत आहे. मराठी स्त्री-पुरुष वाचकांची संख्या सालोसाल वाढत आहे व ग्रंथालयांसहि सरकारचा आणि लोकांचा अधिकाधिक आश्रय मिळत आहे. लवकरच "समग्र कालिदास" भारत सरकारच्या आश्रयाखालीं व विद्वत्श्रेष्ठ डॉ. राधाकृष्णन् यांच्या संपादकत्वाखालीं प्रसिद्ध होणार आहे. अशा अनुकूल वातावरणांत माझा अनुवाद प्रसिद्ध करण्याचें भाग्य मला लाभत आहे म्हणून आनंद वाटतो. मी आर्थिक फायद्याच्या दृष्टीनें हें काम अंगावर घेतलें नाहीं. अर्थात् नुकसान न झालें, तर आनंद वाटणें साहजिकच आहे. 'यशः पुण्यै रवाप्यते' तें पुण्य पदरीं असेल, तर अनुरूप यश मिळेलच.

शेवटीं जगदीशाचे आभार मानून वाचकांची रजा घेतों.

बेळगांव<br>ता. २१-४-५५

गणेश नीलकण्ठ कात्रे.



## कठीण शब्दांचे अर्थ

कुटज– कुडा
पथिक– प्रवासी
बिस– कमलतंतु
विप्रयोग– वियोग
उरोज– स्तन
परिसर– आसपासचा प्रदेश
ग्रीवा– मान
नागाजिन– हत्तीचें कातडें
प्रस्तर– खडक
कुवलय– कमल
शरभ– आठ पायांचा सिंहा-
पेक्षां प्रबळ हिमालयांतील प्राणी

व्योम– आकाश
पाथेय– शिदोरी
श्रोत्ररम्य– कानांला गोड लागणारे
सुरभि– सुवासिक
हरित– हिरवे
कांची– कमरपट्टा
कनकनिकष– सोन्याचा कस पाहण्याचा दगड
तुहिन– बर्फ

स्ववंधू– देवांगना
त्रिदश– देव
स्वर्धुनी– गंगा
कुरबक– कोरांटी
सिकता– वाळू
कलभ– हत्तीचें पिल्लू

हलधर– बळराम
हेमांभोज– सोनेरी कमळ
सरसिज– कमळ
विकच– फुललेलें
दुकूल– रेशमी वस्त्र
बर्ह– मोराचें पिस

## कांहीं स्पष्टीकरणात्मक टीपा

**पुष्कर व आवर्तक**(पूर्व मेघ श्लो. ६)– हे प्रलयकाळीं वर्षणारे मेघ असें पुराणांत वर्णन आहे.

**उदयन**(पू.मे ३०)– हा कौशांबी नगरीचा राजा. उज्जयिनीच्या प्रद्योत राजास वासवदत्ता नांवाची सुंदर कन्या होती. ती, प्रद्योतानें संजय नांवाच्या राजपुत्रास देऊं केली होती, पण तिचें उदयनावर प्रेम होतें व तिच्या गुप्त निरोपावरून उदयनानें तिचें हरण केलें, अशी कथा आहे.

**रन्तिदेव**(पू.मे. ४५)– रन्तिदेव हा भरतकुलांत उत्पन्न झालेला एक राजा होता. तो अतिशय श्रीमान् व धार्मिक होता. त्यानें इतके गोयज्ञ केले कीं, यज्ञांत मारलेल्या गाईच्या कातड्यांतून स्रवणाऱ्या रक्ताची नदी झाली. तिला **चर्मण्वती** नांव मिळालें. ती हल्लीं **चंबळा** या नांवानें ओळखली जाते.

**सगर**(पू.मे. ५०)– हा पराक्रमी राजा होता. कपिल ऋषीच्या शापानें त्याचे साठ हजार पुत्र भस्म झाले आणि सगराचा पणतु भगीरथ यानें उग्र तप करून गंगा भूतलावर आणली व तिच्या पाण्यानें त्यांचा उद्धार झाला, अशी पौराणिक कथा आहे.

**हंसद्वार व क्रौंचरंध्र**(पू.मे. ५७)– परशुराम हा कैलास पर्वतावर शिवापाशीं धनुर्विद्या शिकत होता, त्यावेळीं त्यानें क्रौंचपर्वतावर बाण मारून त्यास भोंक पाडलें, अशी कथा आहे. त्यास हंसद्वार म्हणतात, कारण हंस त्या भोकांतून मानस सरोवराकडे जातात.

**लंकेशानें शिथिलित** पू मे. ५८)– रावणास बळाचा गर्व होऊन त्यानें कैलास पर्वत उचलण्याचा प्रयत्न केला.

(उत्तर मेघ श्लो. २)– सहाहि ऋतु अलका नगरींत एकाच समयीं वास करीत, या कल्पनेवर या श्लोकांत प्रत्येक ऋतूंतील एकेका फुलाचा उल्लेख आहे.

(उत्तर मेघ श्लो. १५)– बकुळ वृक्षाचे मूळांशीं रूपवती स्त्रियांनीं मद्याच्या गुळण्या टाकल्या म्हणजे त्यास पुष्कळ फुलें येतात व अशोक वृक्षास त्यांनीं लाथ मारली, म्हणजे तो फुलतो अशीहि कविकल्पना आहे.

++ ++ ++ ++ ++ ++

## -शुद्धिपत्र-

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १२ | १७ | पूर्वप्रिति | पूर्वप्रीति |
| १७ | ५ | मुलाच्या | मुलीच्या |
| १८ | २४ | मग | पण |
| १८ | २७ | अपि | अति |
| २१ | ४ | परस्पर चिंतनांत | परस्परचिंतनांत |
| २६ | १६ | 'इतर' हा शब्द गाळणें | |
| ३६ | १८ | प्रत्ययादाश्वसन्तः | प्रत्ययादाश्वसन्त्यः |
| ३६ | २० | न स्यादन्तोऽ | न स्यादन्योऽ |
| ३७ | ३ | सन्नानार्थें | सन्मानार्थे |
| ३७ | १० | इच्छारूपीं | इच्छारूपी |
| ३८ | १२ | राजहंसा | राजहंसाः |
| ५१ | १५ | तूझा | तूला |
| ५३ | १ | पुष्पकंध | पुष्पमेघ |
| ५३ | १३ | नील देह | नीलदेह |
| ६७ | ४ | घ्यावें | घ्यावे |
| ७७ | ७ | विरहवश गे ! | विरहवशगे ! |
| ८१ | ६ | खरें | स्वरें |

# मेघदूतम्

( संस्कृत श्लोक )



## पूर्व मेघः

कश्चित्कान्ताविरहगुरुणा स्वाधिकारात् प्रमत्तः
 शापेनास्तंगमितमहिमा वर्षभोग्येण भर्तुः ।
यक्षश्चक्रे जनकतनयास्नानपुण्योदकेषु
 स्निग्धच्छायातरुषु वसतिं रामगिर्याश्रमेषु ।।१।।

तस्मिन्नद्रौ कतिचिदबलाविप्रयुक्तः स कामी
 नीत्वा मासान्कनकवलयभ्रंशरिक्तप्रकोष्ठः ।
आषाढस्य प्रथमदिवसे मेघमाश्लिष्टसानुं
 वप्रक्रीडापरिणतगजप्रेक्षणीयं ददर्श ।।२।।

तस्य स्थित्वा कथमपि पुरः कौतुकाधानहेतो-
 रन्तर्बाष्पश्चिरमनुचरो राजराजस्य दध्यौ ।
मेघालोके भवति सुखिनोऽप्यन्यथावृत्ति चेतः
 कण्ठाश्लेषप्रणयिनि जने किं पुनर्दूरसंस्थे ।।३।।

# मेघदूत

( मराठी समश्लोकी )



## पूर्व मेघ

एका यक्षाकडुनि घडतां स्वामिकार्यीं प्रमाद
भोगी कांताविरह, महिमालोप तो एक अब्द ।
कष्टी, शापांकित वसतसे रामगिर्याश्रमांत
जेथें छायातरु बहु, जलें जानकीस्नानपूत ॥१॥

झाले तेथें विरहि झुरतां मास कांहीं व्यतीत
हातांतूनी कनकवलय भ्रष्ट होऊनि जात ।
शैलाग्रीं त्या रुचिर दिसला मेघ आषाढ येतां
दंताघातें द्विपवर जणूं क्रीडणीं दंग होता ॥२॥

चित्तीं कौतूहल उपजतां येत कष्टें समोर
राही अश्रू अवरुनि उभा स्तब्ध तो वेळ फार ।
चित्तीं उद्दीपित सुखितही मेघ पाहून होतो
आलिंगाया अधिर दयिता दूर ज्याची न कां तो? ॥३॥

प्रत्यासन्ने नभसि दयिताजीवितालम्बनार्थी
जीमूतेन स्वकुशलमयीं हारयिष्यन्प्रवृत्तिम् ।
स प्रत्यग्रैः कुटजकुसुमैः कल्पितार्घाय तस्मै
प्रीतः प्रीतिप्रमुखवचनं स्वागतं व्याजहार ॥४॥

धूमज्योतिःसलिलमरुतां सन्निपातः क्व मेघः
संदेशार्थाः क्व पटुकरणैः प्राणिभिः प्रापणीयाः ।
इत्यौत्सुक्यादपरिगणयन्गुह्यकस्तं ययाचे
कामार्ता हि प्रकृतिकृपणाश्चेतनाचेतनेषु ॥५॥

जातं वंशे भुवनविदिते पुष्करावर्तकानां
जानामि त्वां प्रकृतिपुरुषं कामरूपं मघोनः ।
तेनार्थित्वं त्वयि विधिवशाद्दूरबन्धुर्गतोऽहं
यांचा मोघा वरमधिगुणे नाधमे लब्धकामा ॥६॥

संतप्तानां त्वमसि शरणं तत्पयोद प्रियायाः
संदेशं मे हर धनपतिक्रोधविश्लेषितस्य ।
गन्तव्या ते वसतिरलका नाम यक्षेश्वराणां
बाह्योद्यानस्थितहरशिरश्चन्द्रिकाधौतहर्म्या ॥७॥

त्वामारूढं पवनपदवीमुद्गृहीतालकान्ताः
प्रेक्षिष्यन्ते पथिकवनिताः प्रत्ययादाश्वसन्त्यः ।
कः संनद्धे विरहविधुरां त्वय्युपेक्षेत जायां
न स्यादन्योऽप्यहमिव जनो यः पराधीनवृत्तिः ॥८॥

आला वर्षासमय म्हणुनी धीर द्यावा प्रियेस
मेघद्वारें कुशल वदुनी वाटलें गुह्यकास ।
सन्मानार्थें कुटजकुसुमें अर्पुनी त्यास ताजीं
संतुष्टात्मा मधुर वचनें स्वागतालागिं योजी ॥ ४ ॥

कोठें ज्याचा पवनसलिलीं धूमतेजांत जन्म
कोठें प्राण्या सुचतुर अशा साध्य तें दूतकर्म ।
नेणोनी हें विनवित घना यक्ष औत्सुक्ययुक्त
कामार्तांना फरक न कळे चेतनाचेतनांत ॥ ५ ॥

विश्वख्यातीं उपजशि कुळीं पुष्करावर्तकाख्य
इच्छारूपीं, अमरपतिच्या सेवकांमाजिं मुख्य ।
जाणोनी हें तुज विनवितों दैवयोगें वियुक्त
दुष्टात्म्यांची उपकृति नको थोर नाहीं म्हणोत ॥ ६ ॥

संतप्तांना निववशि तरी क्षेम सांगे प्रियेस
दूरप्रांतीं विरहि पडलों क्रुद्ध होतां धनेश ।
यक्षेशाची नगरि **अलका** गांठली पाहिजेस
पाही तेथें धवलित उमानाथचंद्रें निवास ॥ ७ ॥

जातां व्योमी बघतिल तुला कुंतलां सांवरून
विश्वासानें पथिकवनिता आस चित्तीं धरून
ठेवी कांता कवण विरहीं जैं असा तूं विशाल
माझ्या ऐसें परवश जिणें तोच ज्याचें असेल ॥ ८ ॥

मन्दं मन्दं नुदति पवनश्चानुकूलो यथा त्वां
वामश्चायं नदति मधुरं चातकस्ते सगन्धः ।
गर्भाधानक्षणपरिचयान्नूनमाबद्धमालाः
सेविष्यन्ते नयनसुभगं खे भवन्तं बलाकाः ॥९॥

तां चावश्यं दिवसगणनात्तत्परामेकपत्नी–
मव्यापन्नामविहतगतिर्द्रक्ष्यसि भ्रातृजायाम् ।
आशाबन्धः कुसुमसदृशं प्रायशो ह्यङ्गनानां
सद्यःपाति प्रणयि हृदयं विप्रयोगे रुणद्धि ॥ १० ॥

कर्तुं यच्च प्रभवति महीमुच्छिलीन्ध्रामवन्ध्यां
तत् श्रुत्वा ते श्रवणसुभगं गर्जितं मानसोत्काः ।
आ कैलासाद्बिसकिसलयच्छेदपाथेयवन्तः
संपत्स्यन्ते नभसि भवतो राजहंसाःसहायाः ॥ ११ ॥

आपृच्छस्व प्रियसखममुं तुंगमालिंग्य शैलं
वन्द्यैः पुंसां रघुपतिपदैरंकितं मेखलासु ।
काले काले भवति भवतो यस्य संयोगमेत्य
स्नेहव्यक्तिश्चिरविरहजं मुंचतो बाष्पमुष्णम् ॥ १२ ॥

मार्गं तावच्छृणु कथयतस्त्वत्प्रयाणानुरूपं
संदेशं मे तदनु जलद श्रोष्यसि श्रोत्रपेयम् ।
खिन्नः खिन्नः शिखरिषु पदं न्यस्य गन्तासि यत्र
क्षीणः क्षीणः परिलघु पयः स्रोतसां चोपभुज्य ॥ १३ ॥

वारा वाहे जणुं तुजसि हा साथ देऊन मंद
हर्षें डावीकडुन घुमतो चातकाचा सुशब्द ।
गर्भाधानोत्सव उमजुनी आपुला याच कालीं
मालाबंधें जमतिल बकी बा ! तुझ्या भोंवतालीं ॥९॥

साध्वी तूझी दिवस वहिनी रोज मोजीत आहे
निर्विघ्नें त्वद्गमन घडतां भेट होई खरें हें ।
स्त्रीचें प्रेमी हृदय हळवें पुष्पसें विप्रयोगीं
आशाबंधाविण न कुणिही सांवरी त्याजलागीं ॥१०॥

ज्यायोगें ही जलधर ! मही कंदसंपन्न होते
त्या बा ! तूझ्या श्रवणमधुरा ऐकुनी गर्जितातें ।
पाथेयाला बिस जमवुनी जात जे **मानसास**
कैलासाच्या पथि तुजसि ते सोबती राजहंस ॥११॥

ह्या अद्रीला प्रिय तव सख्या भेटुनी घे निरोप
पृष्ठीं त्याच्या रघुपतिपदें शोभती धूतपाप ।
जेव्हां जेव्हां सुखकर तुझी त्याजला भेट होते
दावी बाष्पें विरह घडतां दुःख झालें किती तें ॥१२॥

आधीं ऐके मजकडुनि तूं मार्ग तूझा सुगम्य
संदेशातें श्रवण करिजे मागुनी श्रोत्ररम्य ।
विश्रांती घे शिणशिल जधीं पर्वताग्रीं बसून
होई ताजा सलिल हलकें निर्झराचें पिऊन ॥१३॥

अद्रेः शृंगं हरति पवनः किंस्विदित्युन्मुखीभि-
दृष्टोत्साहश्चकितचकितं मुग्धसिद्धांगनाभिः ।
स्थानादस्मात्सरसनिचुलादुत्पतोङमुखः खं
दिङनागानां पथि परिहरन्स्थूलहस्तावलेपान् ॥१४॥

रत्नच्छायाव्यतिकर इव प्रेक्ष्यमेतत्पुरस्ता
द्वल्मीकाग्रात्प्रभवति धनुःखण्डमाखण्डलस्य ।
येन श्यामं वपुरतितरां कान्तिमापत्स्यते ते
बर्हेणेव स्फुरितरुचिना गोपवेषस्य विष्णोः ॥१५॥

त्वय्यायत्तं कृषिफलमिति भ्रूविलासानभिज्ञैः
प्रीतिस्निग्धैर्जनपदवधूलोचनैः पीयमानः ।
सद्यः सीरोत्कषणसुरभि क्षेत्रमारुह्य मालं
किंचित्पश्चाद्व्रज लघुगतिर्भूय एवोत्तरेण ॥१६॥

त्वामासारप्रशमितवनोपप्लवं साधु मूर्ध्ना
वक्ष्यत्यध्वश्रमपरिगतं सानुमानाम्रकूटः ।
न क्षुद्रोऽपि प्रथमसुकृतापेक्षया संश्रयाय
प्राप्ते मित्रे भवति विमुखः किं पुनर्यस्तथोच्चैः ॥१७॥

छन्नोपान्तः परिणतफलद्योतिभिः काननाम्रै-
स्त्वय्यारूढे शिखरमचलः स्निग्धवेणीसवर्णे ।
नूनं यास्यत्यमरमिथुनप्रेक्षणीयामवस्थां
मध्ये श्यामः स्तन इव भुवः शेषविस्तारपाण्डुः ॥१८॥

वेगें जातां तुजसि बघुनी मुग्ध सिद्धांगनांची
वायू हा कां शिखर पळवी कल्पना होत साची ।
वेत:पुंजावरुनि हिरव्या झेंप घे उत्तरेला
शुण्डाक्षेपां चुकवुनि पथीं दिग्गजांच्या विशालां ॥१४॥

इंद्राचें हें धनु चढतसे वारुळापासुनी या
रत्नच्छाया जणु विविध कीं एक जागीं मिळाल्या ।
तेणें मेघा ! अतिशय तुझा श्याम शोभेल वर्ण
मोराचें कीं पिस खुलवितें बालगोपाल कृष्ण ॥१५॥

शेती सारी तुजवरि मनीं जाणुनी सत्वशील
भोळ्या तूतें कृषिकवनिता प्रीतिनें पाहतील ।
मालक्षेत्रें दरवळत जीं चालत्या नांगरानें
जाई त्यांतें भिजवुनि जरा उत्तरेसी त्वरेनें ॥१६॥

वृष्टी मोठी करुनि वणवा पूर्ण केलास नष्ट
मार्गश्रांता धरिल शिखरीं तो तुला आम्रकूट ।
कष्टी मित्रा विमुख न कधीं आठवूनी भलाई
लोकीं सामान्यहि, मग असा उच्च तो केंवि होई ॥१७॥

पक्वाम्रांनीं विपुल वनिंच्या येत गौरत्व त्यास
काळा वेणीसम शिखरिं तूं त्याचिया पातलास ।
देवांच्याही युवयुवतिंना तो पहायास मौज
मध्यें काळा धवल भंवतीं कीं महीचा उरोज ॥१८॥

स्थित्वा तस्मिन्वनचरवधूभुक्तकुंजे मुहूर्तं
तोयोत्सर्गद्रुततरगतिस्तत्परं वर्त्म तीर्णः ।
रेवां द्रक्ष्यस्युपलविषमे विन्ध्यपादे विशीर्णां
भक्तिच्छेदैरिव विरचितां भूतिमंगे गजस्य ॥ १९ ॥

तस्यास्तिक्तैर्वनगजमदैर्वासितं वान्तवृष्टि-
र्जम्बूकुंजप्रतिहतरयं तोयमादाय गच्छेः ।
अन्तःसारं घन तुलयितुं नानिलः शक्ष्यति त्वां
रिक्तः सर्वो भवति हि लघुः पूर्णता गौरवाय ॥२० ॥

नीपं दृष्ट्वा हरितकपिशं केसरैरर्धरूढै-
राविर्भूतप्रथममुकुलाः कन्दलीश्चानुकच्छम् ।
जग्ध्वारण्येष्वधिकसुरभिं गन्धमाघ्राय चोर्व्याः
सारंगास्ते जललवमुचः सूचयिष्यन्ति मार्गम् ॥ २१ ॥

उत्पश्यामि द्रुतमपि सखे मत्प्रियार्थं यियासोः
कालक्षेपं ककुभसुरभौ पर्वते पर्वते ते ।
शुक्लापांगैः सजलनयनैः स्वागतीकृत्य केकाः
प्रत्युद्यातः कथमपि भवान्गन्तुमाशु व्यवस्येत् ॥ २२ ॥

पाण्डुच्छायोपवनवृतयः केतकैः सूचिभिन्नै-
र्नीडारम्भैर्गृहबलिभुजामाकुलग्रामचैत्याः ।
त्वय्यासन्ने परिणतफलश्यामजम्बूवनान्ताः
संपत्स्यन्ते कतिपयदिनस्थायिहंसा दशार्णाः ॥ २३ ॥

त्याच्या कुंजीं रमति शबरी थांब तेथें मुहूर्त
गांठी विंध्याचल मग पुढें वृष्टि होतां दमांत ।
तेथें **रेवा** खळखळ अशी प्रस्तरीं वाहताहे
हत्तीची ती जणुं सजविल्या रंगभूषाच आहे ॥१९॥

वृष्टीनें तूं कृश, गति तिची जंबुकुंजांत मंद
सेवी पाणी वनगजमदें जाहलें जें सुगंध ।
वारा तूतें मग न ढळवी शक्तिमंता पयोदा !
निःसाराला कुणि न पुसती मान देती समृद्धा ॥२०॥

जाती अर्धस्फुटित बघुनी नीपपुष्पांस भृंग
आर्द्र स्थानीं वनकदलिना भक्षिती ते कुरंग ।
तैसे येती वनगज तिथें घ्यावया भू-सुवास
विंध्यारण्यीं सुचवितिल हे मार्ग जा सावकाश ॥२१॥

मत्कार्यार्थं त्वरित गतिनें इच्छिशी जावयास
शैलींशैलीं कुटजसुरभीं वेळ जाईल खास ।
सानंदाश्रू असतिल तिथें स्वागताला मयूर
केका त्यांच्या श्रवण करुनी हो निघाया तयार ॥२२॥

उद्यानांच्या भंवतिं फुलत्या केतकी टोंकदार
ग्रामीं वृक्षीं घरटिं रचण्यामाजिं काकादि चूर ।
झाले ज्याचे परिसर निळे पक्व जंबूफलांनीं
हंसां कांहीं दिन तरि रुचे, पोंचशी त्या **दशार्णीं** ॥२३॥

तेषां दिक्षु प्रथितविदिशालक्षणां राजधानीं
गत्वा सद्यः फलमविकलं कामुकत्वस्य लब्धा ।
तीरोपान्तस्तनितसुभगं पास्यसि स्वादु यस्मा-
त्सभ्रूभङ्गं मुखमिव पयो वेत्रवत्याश्चलोर्मि ॥२४॥

नीचैराख्यं गिरिमधिवसेस्तत्र विश्रामहेतो-
स्त्वसंपर्कात्पुलकितमिव प्रौढपुष्पैः कदम्बैः ।
यः पण्यस्त्रीरतिपरिमलोद्गारिभिर्नागराणा-
मुद्दामानि प्रथयति शिलावेश्मभिर्यौवनानि ॥२५॥

विश्रान्तः सन्व्रज वननदीतीरजातानि सिंच-
न्नुद्यानानां नवजलकणैर्यूथिकाजालकानि ।
गण्डस्वेदापनयनरुजाक्लान्तकर्णोत्पलानां
छायादानात्क्षणपरिचितः पुष्पलावीमुखानाम् ॥२६॥

वक्रः पन्था यदपि भवतः प्रस्थितस्योत्तराशां
सौधोत्संगप्रणयविमुखो मा स्म भूरुज्जयिन्याः ।
विद्युद्दामस्फुरितचकितैस्तत्र पौराङ्गनानां
लोलापाङ्गैर्यदि न रमसे लोचनैर्वंचितोऽसि ॥२७॥

वीचिक्षोभस्तनितविहगश्रेणिकांचीगुणायाः
संसर्पन्त्याः स्खलितसुभगं दर्शितावर्तनाभेः ।
निर्विन्ध्यायाः पथि भव रसाभ्यन्तरः सन्निपत्य
स्त्रीणामाद्यं प्रणयवचनं विभ्रमो हि प्रियेषु ॥२८॥

त्या देशाची प्रथित **विदिशा** राजधानी महींत
   जाई तेथें रमवि हृदया कामरंगीं नितांत ।
जीच्या तोयीं उठति लहरी ऐकुनी त्वद्ध्वनीस
   **बट्वा** ती कीं युवति रमणा दाविते भ्रूविलास ॥२४॥

नीचैर्नामें गिरिवरि घना ! क्लेशशांत्यर्थ थांब
   त्वत्संपर्कें पुलकित जणूं पुष्पशाली कदंब ।
वेश्यासंगें तरुणजन जे तेथ रंगेल येती
   त्यांच्या लीला रतिपरिमलें कंदरीं स्पष्ट होती ॥२५॥

जातां मार्गश्रम वननदीतीरिंच्या तूं जुईच्या
   शिंपूनिया हळुहळु कळ्या मार्ग लागे क्रमाया ।
पद्में कानांवरिल सुकलीं वारितां घाम ज्यांचीं
   छायादानें क्षण तरि खुलो कांति त्या माळिणींची ॥२६॥

सोडूनीया सरळ जरिही मार्ग जाणें पडेल
   उज्जैनीच्या परि न चुकवी मित्र ! सौधां विशाल ।
तेथें विद्युत्स्फुरण बघुनी होत ज्या चंचलाक्षा
   नारी त्या तूं बघशि न जरी व्यर्थ मानी त्वदक्षां ॥२७॥

लाटा येतां कलरव करी हंसमालाच कांची
   दावी नाभी अडखळुनि कां भोंवरारूप साची ।
निर्विन्ध्या ती पथि जंव मिळे जा तिच्याशीं रमून
   स्त्रीची भाषा प्रथम रमणीं मुग्ध शृंगार जाण ॥२८॥

वेणीभूतप्रतनुसलिलासावतीतस्य सिंधुः
पाण्डुच्छाया तटरुहतरुभ्रंशिभिर्जीर्णपर्णैः ।
सौभाग्यं ते सुभग विरहावस्थया व्यंजयन्ती
कार्श्यं येन त्यजति विधिना स त्वयैवोपपाद्यः ॥२९॥

प्राप्यावन्तीनुदयनकथाकोविदग्रामवृद्धा-
न्पूर्वोद्दिष्टामनुसर पुरीं श्रीविशालां विशालाम् ।
स्वल्पीभूते सुचरितफले स्वर्गिणां गां गतानां
शेषैः पुण्यैर्हृतमिव दिवः कान्तिमत्खण्डमेकम् ॥३०॥

दीर्घीकुर्वन्पटु मदकलं कूजितं सारसानां
प्रत्यूषेषु स्फुटितकमलामोदमैत्रीकषायः ।
यत्र स्त्रीणां हरति सुरतग्लानिमङ्गानुकूलः
शिप्रावातः प्रियतम इव प्रार्थनाचाटुकारः ॥३१॥

(प्रक्षिप्त)

हारांस्तरांस्तरलगुटिकान्कोटिशः शङ्खशुक्तीः
शष्पश्यामान्मरकतमणीनुन्मयूखप्ररोहान् ।
दृष्ट्वा यस्यां विपणिरचितान्विद्रुमाणां च भङ्गा-
न्संलक्ष्यन्ते सलिलनिधयस्तोयमात्रावशेषाः ॥

जालोद्गीर्णैरुपचितवपुः केशसंस्कारधूपै-
र्बन्धुप्रीत्या भवनशिखिभिर्दत्तनृत्योपहारः ।
हर्म्येष्वस्याः कुसुमसुरभिष्वध्वखेदं नयेथा
लक्ष्मीं पश्यंल्ललितवनितापादरागांकितेषु ॥३२॥

सिंधू वेणीसम मग पुढें वाहणारी दिसेल
पाचोळा जी पडुनि दिसते म्लान तीरावरील ।
ती त्वद्भाग्य प्रकटित करी बा ! वियोगीं झुरून
जेणें होई फिरुनि पहिली सर्व जा तें करून ॥२९॥

गांवोंगांवीं उदयन-कथाख्यान त्या माळव्याची
उज्जैनी मी तुजसि वदलों श्री तिथें मूर्त साची ।
स्वर्गस्थांनीं परत फिरतां देउनी पुण्य कांहीं
स्वर्गाचा तो अतिसुभगसा आणिला भाग पाही ॥३०॥

जो अंभोदा ! घुमवि मिथुनें सारसांची मदांत
पद्मांचा जो लुटुनि सगळा गंध वाहे प्रशांत ।
नारींची जो हरवि सुरतग्लानि शिप्रासमीर
तो कीं कांतें फिरुनि रमण्या चालवीला प्रकार ॥३१॥

(प्रक्षिप्त)

मुक्तामाला मणियुत किती शंखशुक्ती उदंड
दिव्य ज्योती हरिततृणसे कैक ते पाचुखंड ।
तेथें पेठेंतुनि बघुनिया भिन्नजाति प्रवाल
भासावें कीं उदधित जलावीण कांहीं नसेल ॥

जाळीमार्गें वर चढति ते केशसंस्कार-धूप
पुष्टी देती तुज गृहशिखी भेट ही नृत्यरूप ।
नानापुष्पीं सुरभित तसे कामिनीपादरक्त
तत्प्रासादां बघत फिरतां क्लेश होतील लुप्त ॥३२॥

भर्तुः कण्ठच्छविरिति गणैः सादरं वीक्ष्यमाणः
पुण्यं यायास्त्रिभुवनगुरोर्धाम चण्डीश्वरस्य ।
धूतोद्यानं कुवलयरजोगन्धिभिर्गन्धवत्या–
स्तोयक्रीडानिरतयुवतिस्नानतिक्तैर्मरुद्भिः ॥३४॥

अप्यन्यस्मिन् जलधर महाकालमासाद्य काले
स्थातव्यं ते नयनविषयं यावदत्येति भानुः ।
कुर्वन्संध्याबलिपटहतां शूलिनः श्लाघनीया–
मामन्द्राणां फलमविकलं लप्स्यसे गर्जितानाम् ॥३५॥

पादन्यासैः क्वणितरशनास्तत्र लीलावधूतै
रत्नच्छायाखचितवलिभिश्चामरैः क्लान्तहस्ताः ।
वेश्यास्त्वत्तो नखपदसुखान्प्राप्य वर्षाग्रबिन्दू–
नामोक्ष्यन्ते त्वयि मधुकरश्रेणिदीर्घान्कटाक्षान् ॥३६॥

पश्चादुच्चैर्भुजतरुवनं मण्डलेनाभिलीनः
सान्ध्यं तेजः प्रतिनवजपापुष्परक्तं दधानः ।
नृत्यारम्भे हर पशुपतेरार्द्रनागाजिनेच्छां
शान्तोद्वेगस्तिमितनयनं दृष्टभक्तिर्भवान्या ॥३७॥

गच्छन्तीनां रमणवसतिं योषितां तत्र नक्तं
रुद्धालोके नरपतिपथे सूचिभेद्यैस्तमोभिः ।
सौदामन्या कनकनिकषस्निग्धया दर्शयोर्वीं
तोयोत्सर्गस्तनितमुखरो मा स्म भूर्विक्लवास्ताः ॥३८॥

शंभुग्रीवेसम घननिळा प्रेक्ष्य त्याच्या गणांस
जाई भावें जलधर ! महाकालदेवालयास ।
तत्रोद्यानीं कमलसुरभीं गंडकीच्यावरील
वाहे वारा हरुनि युवति स्नानगंधा सलील ॥३३॥

तेथें तूझें गमन घडलें अन्य काळीं तरीही
भानू अस्ताप्रति गमतसे तेथपर्यंत राही ।
संध्यापूजासमयिं करितां कार्य तूं चौघडयाचें
लाधे पुण्य प्रचुर तुजला मंद-धीर ध्वनीचें ॥३४॥

ज्यांच्या कांची रुमझुम असा नर्तनीं नाद देती
ज्यांना रत्नोज्ज्वलित चंवरी ढाळतां शीण हातीं ।
वेश्या ऐशा नवजलकणें होतसे ज्यांस तोष
भृंगालींच्या सम तुजकडे दीर्घ देती कटाक्ष ॥३५॥

जास्वंदीच्या नवकुसुमसा रक्त संध्याद्युतीनें
पूजा होतां शिवभुजवना व्यापुनी जा क्रमानें ।
नृत्यारंभी पुरविशि हरा आर्द्र नागाजिनास
त्वद्भक्तीचा बघिल गिरिजा शांतनेत्रीं विलास ॥३६॥

जाती रात्रीं प्रियकरगृहां कामिनी भेटण्यास
अंधारानें निबिड न दिसे राजमार्गी तयास ।
रस्ता दावी कनकनिकषीं रेघशा तूं विजेनें
भीरूंना त्या परि न भिववी वृष्टिनें, गर्जितानें ॥३७॥

तां कस्यांचिद्भवनवलभौ सुप्तपारावतायां
नीत्वा रात्रिं चिरविलसनात्खिन्नविद्युत्कलत्रः ।
दृष्टे सूर्ये पुनरपि भवान्वाहयेदध्वशेषं
मन्दायन्ते न खलु सुहृदामभ्युपेतार्थकृत्याः ॥३८॥

तस्मिन्काले नयनसलिलं योषितां खण्डितानां
शान्तिं नेयं प्रणयिभिरतो वर्त्म भानोस्त्यजाशु ।
प्रालेयास्त्रं कमलवदनात्सोऽपि हर्तुं नलिन्याः
प्रत्यावृत्तस्त्वयि कररुधि स्यादनल्पाभ्यसूयः ॥३९॥

गम्भीरायाः पयसि सरितश्चेतसीव प्रसन्ने
छायात्मापि प्रकृतिसुभगो लप्स्यते ते प्रवेशम् ।
तस्मादस्याः कुमुदविशदान्यर्हसि त्वं न धैर्या-
न्मोघीकर्तुं चटुलशफरोद्वर्तनप्रेक्षितानि ॥४०॥

तस्याः किंचित्करधृतमिव प्राप्तवानीरशाखं
नीत्वा नीलं सलिलवसनं मुक्तरोधोनितम्बम् ।
प्रस्थानं ते कथमपि सखे लम्बमानस्य भावि
ज्ञातास्वादो विवृतजघनां को विहातुं समर्थः ॥४१॥

त्वन्निष्यन्दोच्छ्वसितवसुधागन्धसंपर्करम्यः
स्रोतोरन्ध्रध्वनितसुभगं दन्तिभिः पीयमानः ।
नीचैर्वास्यत्युपजिगमिषोर्देवपूर्वं गिरिं ते
शीतो वायुः परिणमयिता काननोदुम्बराणाम् ॥४२॥

कोठें गच्चीवर मग जिथें पारवे झोंप घेत
विद्युत्संगें रमुनि दमतां घालवी शेषरात ।
होतां सूर्योदय परि निघे शेष मार्ग क्रमाया
हातीं घेतां शिथिल न कुणी मित्रकार्या कराया ॥३८॥

प्रातःकाळीं पुसुनि नयनां वंचिल्या वल्लभांना
सांत्वायातें रमण निघतां आड सूर्यास ये ना ।
तोही येतो हिम निपटुनी पद्मिनी हांसवाया
चंडांशूचा तुजवरि नसो क्रोध बा ! मेघराया ॥३९॥

गंभीरेच्या विमलसलिलीं शुद्धचेतःसमानीं
छायाबिंबें नयनरुचिरा ! जात येथें कळोनी ।
मीनोड्डाणें धवल कमलासारखीं तत्कटाक्ष
आढ्यत्वें तूं विफल न करी भेट तीतें समक्ष ॥४०॥

पाणी वेत्रीं निळसर तिचें तीर सोडून चाले
भासावें कीं वसन सुटलें तें तिनें सावरीलें ।
आतां तूझा तिथुनि निघण्या वेळ होईल भारी
ज्ञातास्वाद प्रकटजघनामोह कैसा निवारी ? ॥४१॥

गंधें गेला भरुनि जलदा ! वृष्टिसंतृप्तभूच्या
शुंडारंध्रीं फुरफुर शिरे तोषलेल्या द्विपांच्या ।
वारा ऐसा सुखद पिकवी जो वनीं उंबरांस
देवाद्रीच्या पथिं तुजसि तो संथ पंखाच्च खास ॥४२॥

तत्र स्कन्दं नियतवसतिं पुष्पमेघीकृतात्मा
पुष्पासारैः स्नपयतु भवान्व्योमगङ्गाजलार्द्रैः ।
रक्षाहेतोर्नवशशिभृता वासवीनां चमूना–
मत्यादित्यं हुतवहमुखे संभृतं तद्धि तेजः ॥४३॥

ज्योतिर्लेखावलयि गलितं यस्य बर्हं भवानी
पुत्रप्रेम्णा कुवलयदलक्षेपि कर्णे करोति ।
धौतापाङ्गं हरशशिरुचा पावकेस्तं मयूरं
पश्चादद्रिग्रहणगुरुभिर्गर्जितैर्नर्तयेथाः ॥४४॥

आराध्यैनं शरवणभवं देवमुल्लंघिताध्वा
सिद्धद्वन्द्वैर्जलकणभयाद्वीणिभिर्मुक्तमार्गः ।
व्यालम्बेथाः सुरभितनयालम्भजां मानयिष्य–
न्स्रोतोमूर्त्या भुवि परिणतां रन्तिदेवस्य कीर्तिम् ॥४५॥

त्वय्यादातुं जलमवनते शार्ङ्गिणो वर्णचौरे
तस्याः सिन्धोः पृथुमपि तनुं दूरभावात्प्रवाहम् ।
प्रेक्षिष्यन्ते गगनगतयो नूनमावर्ज्य दृष्टी–
रेकं मुक्तागुणमिव भुवः स्थूलमध्येन्द्रनीलम् ॥४६॥

तामुत्तीर्य व्रज परिचितभ्रूलताविभ्रमाणां
पक्ष्मोत्क्षेपादुपरिविलसत्कृष्णशारप्रभाणाम् ।
कुन्दक्षेपानुगमधुकरश्रीमुषामात्मबिम्बं
पात्रीकुर्वन्दशपुरवधूनेत्रकौतूहलानाम् ॥४७॥

तेथें स्कंद स्थिर म्हणुनि तूं होउनी पुष्पमेघ
स्वर्गंगार्द्रा तदुपरि करी पुष्पवृष्टि प्रदीर्घ।
तो शंभूनें अनलवदनीं, रक्षण्या इंद्रसैन्य
सूर्याहूनि प्रखर अपुलें ठेविलें तेज नान्य ॥४३॥

पुत्रप्रेमें कुवलयदला टाकुनी कांतरंगी
घाली ज्याचें गलित पिसही अंबिका कर्णभागीं।
श्रीशंभूचा विधु धवलता देत ज्याच्या अपांगां
त्या मोराला घुमवित गुहा गर्जितें नाचवी गा! ॥४४॥

झाला मार्गक्रम बहु अशी स्कंदपूजाहि झाली
वीणाधारी जलकणभयें सिद्धयुग्में निघालीं।
सत्कारावी मग पथि नदी धेनुरक्तोद्भवा ती
वाहे लोकीं जल बनुन कीं रंतिदेवीय कीर्ति ॥४५॥

सेवाया तूं जल उतरसी कृष्णसा नील देह
तीचा मोठा परि लघु दिसे तो वरूनि प्रवाह।
गंधर्वादि बघतिल तुम्हां नेत्र रोखून सर्व
भूची मुक्तावलिच गणुनी सेंद्रनीला अपूर्व ॥४६॥

जातां तूंतें पुढति जलदा! भ्रूविलासीं अभिज्ञ
अंतःकांती प्रतिनिमिष जे दर्शवीती मनोज्ञ।
जे भासावे भ्रमर हलत्या कुंद पुष्पांवरील
ऐशा नेत्रीं दशपुरवधू प्रीतिनें पाहतील ॥४७॥

ब्रह्मावर्तं जनपदमथ च्छायया गाहमानः
क्षेत्रं क्षत्रप्रधनपिशुनं कौरवं तद्भजेथाः ।
राजन्यानां सितशरशतैर्यत्र गाण्डीवधन्वा
धारापातैस्त्वमिव कमलान्यभ्यवर्षन्मुखानि ॥४८॥

हित्वा हालामभिमतरसां रेवतीलोचनाङ्कां
बन्धुप्रीत्या समरविमुखो लाङ्गली याः सिषेवे ।
कृत्वा तासामभिगममपां सौम्य सारस्वतीना–
मन्तः शुद्धस्त्वमपि भविता वर्णमात्रेण कृष्णः ॥४९॥

तस्माद्गच्छेरनुकनखलं शैलराजावतीर्णां
जन्होः कन्यां सगरतनयस्वर्गसोपानपंक्तिम् ।
गौरीवक्त्रभ्रुकुटिरचनां या विहस्येव फेनैः
शंभोः केशग्रहणमकरोदिन्दुलग्नोर्मिहस्ता ॥५०॥

तस्याः पातुं सुरगज इव व्योम्नि पश्चार्धलम्बी
त्वं चेदच्छस्फटिकविशदं तर्कयेस्तिर्यगम्भः ।
संसर्पन्त्या सपदि भवतः स्रोतसि च्छाययासौ
स्यादस्थानोपगतयमुनासङ्गमेवाभिरामा ॥५१॥

आसीनानां सुरभितशिलं नाभिगन्धैर्मृगाणाम्
तस्या एव प्रभवमचलं प्राप्य गौरं तुषारैः ।
वक्ष्यस्यध्वश्रमविनयने तस्य शृङ्गे निषण्णः
शोभां शुभ्रत्रिनयनवृषोत्खातपङ्कोपमेयाम् ॥५२॥

ब्रह्मावर्त क्रमित असतां दे जनां शीत छाया
पाही योद्धे अमित लढले तें कुरुक्षेत्र राया।
पार्थें जेथें उडविलि शिरें पार्थिवांचीं शरांनीं
पद्में तूंही निपटिशि जशी चंडवृष्टी करोनी ॥४८॥

युद्धोद्विग्न त्यजुनि मदिरा रेवतीनेत्रबिंबा
बंधुप्रेमें, हलधर जया सेविता जाहला बा ! ।
त्या नीराशीं परिचय घडो मित्र ! सारस्वताशीं
वर्णें काळा असिस परि तूं अंतरीं शुद्ध होशी ॥४९॥

येई आतां कनखल जिथें सोडूनी शैलनाथा
गंगा वाहे सगरतनयां, स्वर्गसोपानभूता
फेंसानें ती हंसत जणुं कां पार्वतीच्या अठ्यांस
लाटांनीं कां शशिसह धरी शंकराच्या कचांस ॥५०॥

तीच्या नीरा स्फटिकधवला प्यावयाचें मनांत
आणूनी तूं सुरगज तसा वाकशी जैं नभांत।
छाया तूझी बघुनि जलदा ! तेधवां तत्प्रवाहीं
झाली वाटे फिरुनि यमुनाभेट सौंदर्यवाही ॥५१॥

ज्याच्या केल्या सुरभित शिला कस्तुरीनें मृगांनीं
तो गंगेचा जनक, तुहिनें नीरदा ! गौरवर्णी।
ऐशा त्याच्या शिखरिं बससी घ्यावयाला विसांवा
नंदीनें की उकरुनि गमे मस्तकीं पंक घ्यावा ॥५२॥

तं चेद्वायौ सरति सरलस्कंधसंघट्टजन्मा
बाधेतोल्काक्षपितचमरीबालभारो दवाग्निः ।
अर्हस्येनं शमयितुमलं वारिधारासहस्रै-
रापन्नार्तिप्रशमनफलाः संपदो ह्युत्तमानाम् ॥५३॥

ये संरम्भोत्पतनरभसाः स्वाङ्गभङ्गाय तस्मि-
न्मुक्ताध्वानं सपदि शरभा लङ्घयेयुर्भवन्तम् ।
तान्कुर्वीथास्तुमुलकरकावृष्टिपातावकीर्णा-
न्के वा न स्युः परिभवपदं निष्फलारम्भयत्नाः ॥५४॥

तत्र व्यक्तं दृषदि चरणन्यासमर्धेन्दुमौलेः
शश्वत्सिद्धैरुपचितबलिं भक्तिनम्रः परीयाः ।
यस्मिन्दृष्टे करणविगमादूर्ध्वमुद्धूतपापाः
संकल्पन्ते स्थिरगणपदप्राप्तये श्रद्दधानाः ॥५५॥

शब्दायन्ते मधुरमनिलैः कीचकाः पूर्यमाणाः
संसक्ताभिस्त्रिपुरविजयो गीयते किन्नरीभिः ।
निर्ह्रादस्ते मुरज इव चेत्कन्दरेषु ध्वनिः स्या-
त्संगीतार्थो ननु पशुपतेस्तत्र भावी समग्रः ॥५६॥

प्रालेयाद्रेरुपतटमतिक्रम्य तांस्तान्विशेषा-
न्हंसद्वारं भृगुपतियशोवर्त्म यत्क्रौंचरन्ध्रम् ।
तेनोदीचीं दिशमनुसरेस्तिर्यगायामशोभि
श्यामः पादो बलिनियमनाभ्युद्यतस्येव विष्णोः ॥५७॥

तेथें दावानल जर उठे वायुवेगें द्रुमांत
यत्स्पर्शेंही जळति चमरीकेश ते शोभिवंत ।
पर्जन्याच्या सरिवर सरी सोड तूं शांत व्हाया
थोरांचें तें विभव असतें दीनदुःखें हराया ॥५३॥

तेथें जातां सरळ चिडुनी धांवणारे सवेग
येती तूंतें शरभ अडवे नेणुनी देहभंग ।
गारांची तूं तुमुळ करुनी वृष्टि दे घालवून
व्यर्थोद्योगीं निरत असल्या कोण देईल मान? ॥५४॥

कोठें सिद्धार्चित शिवपदें तूं जरी पाहशील
जाई त्यांच्या भंवतिं फिरुनी होउनी भक्तिशील ।
देहत्यागासमयिं दुरितां नासुनी दर्शनानें
श्रद्धावंतां शिवगणप्राप्ति हो निश्चयानें ॥५५॥

वेणू तेथें मधुर करिती नाद वायुप्रपूर्त
मेळाव्यानें त्रिपुरविजया किन्नरी गोड गात ।
तूझा मेघा ! ध्वनि घुमतसे कंदरीं तो मृदंग
श्रीशंभूचें खचित जमलें गान साहित्य सांग ॥५६॥

ओलांडूनी गिरितटिं असे रम्य नाना प्रदेश
येशी केलें प्रथित मग तूं भार्गवें ज्या स्थळास ।
हंसद्वारीं शिरसि जधि त्या क्रौंचरंध्रीं अरुंद
वाटावें कीं बळिस दडपी वामनाचाच पाद ॥५७॥

गत्वा चोर्ध्वं दशमुखभुजोच्छ्वासितप्रस्थसंधेः
कैलासस्य त्रिदशवनितादर्पणस्यातिथिः स्याः ।
शृंगोच्छ्रायैः कुमुदविशदैर्यो वितत्य स्थितः खं
राशीभूतः प्रतिदिनमिव त्र्यम्बकस्याट्टहासः ॥५८॥

उत्पश्यामि त्वयि तटगते स्निग्धभिन्नांजनाभे
सद्यःकृत्तद्विरदशनच्छेदगौरस्य तस्य ।
शोभामद्रेः स्तिमितनयनप्रेक्षणीयां भवित्री–
मंसन्यस्ते सति हलभृतो मेचके वाससीव ॥५९॥

हित्वा तस्मिन्भुजगवलयं शंभुना दत्तहस्ता
क्रीडाशैले यदि च विचरेत्पादचारेण गौरी ।
भङ्गीभक्त्या विरचितवपुः स्तम्भितान्तर्जलौघः
सोपानत्वं कुरु मणितटारोहणायाग्रयायी ॥६०॥

तत्रावश्यं वलयकुलिशोद्धट्टनोद्गीर्णतोयं
नेष्यन्ति त्वां सुरयुवतयो यन्त्रधारागृहत्वम् ।
ताभ्यो मोक्षस्तव यदि सखे घर्मलब्धस्य न स्या–
त्क्रीडालोलाः श्रवणपरुषैर्गर्जितैर्भाययेस्ताः ॥६१॥

हेमाम्भोजप्रसवि सलिलं मानसस्याददानः
कुर्वन्कामं क्षणमुखपटप्रीतिमैरावतस्य ।
धुन्वन्कल्पद्रुमकिसलयान्यंशुकानीव वातै–
र्नानाचेष्टैर्जलद ललितैर्निर्विशेस्तं नगेन्द्रम् ॥६२॥

लंकेशें जो शिथिलित पुरा, येत कैलास त्याचा
होई आतां अतिथि जलदा ! स्वर्वधूदर्पणाचा ।
व्योमस्पर्शी बघुनि शिखरें शुभ्र पद्मापरीस
राशींनीं कीं प्रतिदिनिं चढे शंभुचा अट्टहास ॥५८॥

तूझा त्याच्या शिखरिं असतां रंग तो काजळाचा
वर्णे तोही शकलित जणूं दंत ताजा गजाचा ।
ऐसें दृश्य स्तिमितनयनें पाहण्या होय पात्र
स्कंधीं घेई हलधर जणूं कृष्णवर्णीय वस्त्र ॥५९॥

श्रीशंभूचा कर धरुनियां सर्प नाहीं ज्यांत
तेथें गौरी फिरत जरि कां पादचारी सुखांत ।
नीराच्या तूं स्थगित करुनी अंतरीच्या प्रवाहा
हो सोपानासम मणितटारोहणीं अंबुवाहा ॥६०॥

देऊनीयां त्रिदशयुवती कंकणांचे प्रहार :
स्नानाचें कीं गृह बनविती बा ! तुला यंत्रधार ।
घर्मार्ता त्या तुजसि जरि कां ठेवुनी फार घेती
क्रीडासक्तां श्रुतिकटु अशा गर्जितें दाव भीती ॥६१॥

हेमांभोजें विकसति जिथें नीर पी मानसाचें
मौजेनें हो मुखपट जणूं वस्त्र ऐरावताचें ।
खेळे कल्पद्रुमकिसलयीं अंशुकीं जेंवि वारा
नानाक्रीडारत गिरिवरीं तूं लुटीं सौख्यभारा ॥६२॥

तस्योत्सङ्गे प्रणयिन इव स्रस्तगङ्गादुकूलां
न त्वं दृष्ट्वा न पुनरलकां ज्ञास्यसे कामचारिन् ।
या वः काले वहति सलिलोद्गारमुच्चैर्विमाना
मुक्ताजालग्रथितमलकं कामिनीवाभ्रवृन्दम् ॥६३॥

---

## उत्तर मेघः



विद्युत्वन्तं ललितवनिताः सेन्द्रचापं सचित्राः
संगीताय प्रहतमुरजाः स्निग्धगम्भीरघोषम् ।
अन्तस्तोयं मणिमयभुवस्तुङ्गमभ्रंलिहाग्राः
प्रासादास्त्वां तुलयितुमलं यत्र तैस्तैर्विशेषैः ॥१॥

हस्ते लीलाकमलमलके बालकुन्दानुविद्धं
नीता लोध्रप्रसवरजसा पाण्डुतामानने श्रीः ।
चूडापाशे नवकुरबकं चारु कर्णे शिरीषं
सीमन्ते च त्वदुपगमजं यत्र नीपं वधूनाम् ॥२॥

(प्रक्षिप्त)

यत्रोन्मत्तभ्रमरमुखराः पादपा नित्यपुष्पा
हंसश्रेणीरचितरशना नित्यपद्मा नलिन्यः ।
केकोत्कण्ठा भवनशिखिनो नित्यभास्वत्कलापा
नित्यज्योत्स्नाः प्रतिहततमोवृत्तिरम्याः प्रदोषाः ॥

तेथें तूला दिसत अलका स्वर्धुनीच्या तिराशीं
कांताकीं कीं गलितवसना कामिनी बैसलीशी ।
तत्प्रासादावरि बघुनिया वर्षणाऱ्या तुम्हांस
मुक्ताजाला शिरीं वरि अशा कामिनीचाच भास ॥६३॥

---

## उत्तर मेघ



चित्रें ऐंद्रा धनुस, रमणी रम्यरूपा विजेस
संगीतीं जे मधुर घुमती ते मृदंग ध्वनीस ।
नीरा स्वच्छ स्फटिकतळ ते सौध आकाशगामी
तत्प्रासादीं बहुविध तुझें भासतें साम्य नामी ॥१॥

क्रीडेसाठीं सरसिज करीं, बालकुंदें कचांत
वक्त्रीं लोधद्रुम-सुमरजें पांडुता रम्य येत ।
चूडापाशीं कुरबक तसें चारु कर्णीं शिरीष
नीपां भांगीं वरिति तिथल्या नित्य नारी विशेष ॥२॥

(प्रक्षिप्त)

झाडें तेथें सतत फुलतां गुंजनीं भृंग गुंग
पद्में तैशीं विकच म्हणुनी क्रीडणीं हंस दंग ।
देती केकाध्वनि गृहशिखी सर्वदा कांतरंग
रात्रीं साऱ्या धवलित करी चंद्रिका ती अभंग ।

(प्रक्षिप्त)

आनन्दोत्थं नयनसलिलं यत्र नान्यैर्निमित्तै-
र्नान्यस्तापः कुसुमशरजादिष्टसंयोगसाध्यात् ।
नाप्यन्यस्मात्प्रणयकलहाद्विप्रयोगोपपत्ति-
र्वित्तेशानां न च खलु वयो यौवनादन्यदस्ति ॥

यस्यां यक्षाः सितमणिमयान्येत्य हर्म्यस्थलानि
ज्योतिश्छायाकुसुमरचितान्युत्तमस्त्रीसहायाः ।
आसेवन्ते मधु रतिफलं कल्पवृक्षप्रसूतं
त्वद्गम्भीरध्वनिषु शनकैः पुष्करेष्वाहतेषु ॥३॥

मन्दाकिन्याः सलिलशिशिरैः सेव्यमाना मरुद्भि-
र्मन्दाराणामनुतटरुहां छायया वारितोष्णाः ।
अन्वेष्टव्यैः कनकसिकतामुष्टिनिक्षेपगूढैः
संक्रीडन्ते मणिभिरमरप्रार्थिता यत्र कन्याः ॥४॥

नीवीबन्धोच्छ्वसितशिथिलं यत्र बिम्बाधराणां
क्षौमं रागादनिभृतकरेष्वाक्षिपत्सु प्रियेषु ।
अर्चिस्तुङ्गानभिमुखमपि प्राप्य रत्नप्रदीपा-
न्ह्रीमूढानाम् भवति विफलप्रेरणा चूर्णमुष्टिः ॥५॥

नेत्रा नीताः सततगतिना यद्विमानाग्रभूमी-
रालेख्यानां नवजलकणैर्दोषमुत्पाद्य सद्यः ।
शङ्कास्पृष्टा इव जलमुचस्त्वादृशा जालमार्गै-
र्धूमोद्गारानुकृतिनिपुणा जर्जरा निष्पतन्ति ॥६॥

(प्रक्षिप्त)

आनंदाश्रूविण जल कधीं तेथ नेत्रीं न येतें
पीडा देहीं मदनशरजा, मीलनें दूर होते ।
होई जो कां प्रणयकलहीं तेवढा विप्रयोग
वित्तेशांची सततचि तिथें यौवनश्री अभंग ॥

तेथें यक्ष स्फटिकखचितीं येउनी हर्म्यभागीं
ताराबिंबें झळकति जिथें पुष्पसी जागजागीं ।
घेती कल्पद्रुमज मदिरा सुंदरींच्या समेत
त्वद्गंभीरध्वनिस तबले साथही गोड देत ॥३॥

वारा गंगेवरिल असतो शीत संतोषवाया
मंदारांची तटिं विपुल ज्या लाभते रम्यछाया ।
ऐशा रत्नें, कनकसिकतागोलकां घेउनियां
बालक्रीडा करिति अमरप्रार्थिता यक्षकन्या ॥४॥

नीवी होतां शिथिल झटती प्रेयसींच्या दुकूलां
कामोद्दीप्त प्रिय झडकरी दूर सारावयाला ।
तेजस्वी त्या तिथिल जलदा ! रत्नदीपां विझाया
लज्जायुक्ता मुठि भरुनियां फेकिती चूर्ण वायां ॥५॥

वाऱ्यानें जे वर चढविले मेघ सौधांत तुंग
त्यांचे येतां जलकण तिथें नासती चित्ररंग ।
जाळ्यांतूनी पळति मग कां होउनी भीतियुक्त
धूमाची ती अनुकृति तयां साधते जन्मजात ॥६॥

यत्र स्त्रीणां प्रियतमभुजालिंगनोच्छ्वासिताना–
मंगग्लानिं सुरतजनितां तन्तुजालावलम्बाः ।
त्वत्संरोधापगमविशदैश्चन्द्रपादैर्निशीथे
व्यालुम्पन्ति स्फुटजललवस्यन्दिनश्चन्द्रकान्ताः ॥७॥

अक्षय्यान्तर्भवननिधयः प्रत्यहं रक्तकण्ठै–
रुद्गायद्भिर्धनपतियशः किंनरैर्यत्र सार्धम् ।
वैभ्राजाख्यं विबुधवनितावारमुख्यासहाया
बद्धालापा बहिरुपवनं कामिनो निर्विशन्ति ॥८॥

गत्युत्कम्पादलकपतितैर्यत्र मन्दारपुष्पैः
पत्रच्छेदैः कनककमलैः कर्णविभ्रंशिभिश्च ।
मुक्ताजालैः स्तनपरिसरच्छिन्नसूत्रैश्च हारै–
र्नैशो मार्गः सवितुरुदये सूच्यते कामिनीनाम् ॥९॥

मत्वा देवं धनपतिसखं यत्र साक्षाद्वसन्तं
प्रायश्चापं न वहति भयान्मन्मथः षट्पदज्यम् ।
सभ्रूभंगप्रहितनयनैः कामिलक्ष्येष्वमोघै–
स्तस्यारम्भश्चतुरवनिताविभ्रमैरेव सिद्धः ॥१०॥

वासश्चित्रं मधु नयनयोर्विभ्रमादेशदक्षं
पुष्पोद्भेदं सह किसलयैर्भूषणानां विकल्पान् ।
लाक्षारागं चरणकमलन्यासयोग्यं च यस्या–
मेकः सूते सकलमबलामण्डनं कल्पवृक्षः ॥११॥

शय्यागारीं रुचिर पडदे तेथ ज्यांनीं खुलावे
ज्योत्स्नायोगें घनविरहितीं अंबरीं जे स्रवावे ।
ऐसे, ग्लानी रतिसमयिची वारिती चंद्रकांत
जेव्हां नारी प्रियकरकरांपासुनी होत मुक्त ।।७।।

नाहीं ज्यांच्या कधिच भवनीं वैभवा न्यून होत
ऐसे कामी रसिक जमुनी अप्सरांच्या समेत
बाह्योद्यानीं सुख मिळविती प्रेमसंभाषणाचें
चाले तेव्हां धनपतियशोगानही किन्नरांचें ।।८।।

मंदारांचीं अलककुसुमें शीघ्र जातां निशेंत
कर्णीभोजें विगलित तशीं पत्रखंडेंही तेथ ।
बिंदीमोतीं स्तनपरिसरीं छिन्नही रत्नहार
होतां सूर्योदय सुचविती कामिनींचा प्रचार ।।९।।

जाणूनीयां धनपतिसखा शंभु तेथेंच राही
भीत, प्रायां मनसिज, धनू भृंगरज्जू न वाही ।
मेघा ! तेथें चतुरललनाभ्रूलतांचे विलास
कामी सारे विवश करण्या होत पर्याप्त त्यास ।।१०।।

वस्त्रें नानाविध गुरुसमा वारुणी भ्रूविलासीं
कोळचा पानांसहितहि कळचा भूषवाया कचांसी ।
सौंदर्याच्या विविध रचना पादभूषेस लाक्षा
नारींना ही सकलचि तिथें चिंतितां कल्पवृक्षा ।।११।।

तत्रागारं धनपतिगृहानुत्तरेणास्मदीयं
दूराल्लक्ष्यं सुरपतिधनुश्चारुणा तोरणेन ।
यस्योपान्ते कृतकतनयः कान्तया वर्धितो मे
हस्तप्राप्यस्तबकनमितो बालमन्दारवृक्षः ॥१२॥

वापी चास्मिन्मरकतशिलाबद्धसोपानमार्गा
हैमैश्छन्ना विकचकमलैः स्निग्धवैदूर्यनालैः ।
यस्यास्तोये कृतवसतयो मानसं सन्निकृष्टं
नाध्यास्यन्ति व्यपगतशुचस्त्वामपि प्रेक्ष्य हंसाः ॥१३॥

तस्यास्तीरे रचितशिखरः पेशलैरिन्द्रनीलैः
क्रीडाशैलः कनककदलीवेष्टनप्रेक्षणीयः ।
मद्गेहिन्याः प्रिय इति सखे चेतसा कातरेण
प्रेक्ष्योपान्तस्फुरिततडितं त्वां तमेव स्मरामि ॥१४॥

रक्ताशोकश्चलकिसलयः केसरश्चात्र कान्तः
प्रत्यासन्नौ कुरबकवृतेर्माधवीमण्डपस्य ।
एकः सख्यास्तव सह मया वामपादाभिलाषी
काङ्क्षत्यन्यो वदनमदिरां दोहदच्छद्मनास्याः ॥१५॥

तन्मध्ये च स्फटिकफलका कांचनी वासयष्टि-
र्मूले बद्धा मणिभिरनतिप्रौढवंशप्रकाशैः ।
तालैः शिंजावलयसुभगैर्नर्तितः कान्तया मे
यामध्यास्ते दिवसविगमे नीलकण्ठः सुहृद्वः ॥१६॥

माझा वाडा धनपतिगृहापासुनी उत्तरेस
देवेशाच्या धनुसम पहा लांबुनी तोरणास ।
तेथें आहे तनय गणुनी वाढवीला प्रियेनें
मंदाराचा तरु चिमुकला गुच्छ घ्यावें करानें ॥१२॥

पाचूखंडीं विरचित अशा पायऱ्या जीस वापी
पृष्ठीं तीच्या कनककमलें नाल वैदूर्यरूपी ।
तीच्या तोयीं विहरति सुखें राहुनी राजहंस
आला वर्षासमय तरिही नेच्छिती **मानसास** ॥१३॥

तीच्या कांठीं कनककदलींवेष्टणें प्रेक्षणीय
क्रीडाद्री यच्छिखर रचिलें इंद्रनीलीं सुदिव्य ।
विदुल्लेखेसहित तुजला पाहुनी भीतभीत
मत्कांतेला प्रिय अति अशा मी तया आठवीत ॥१४॥

कोरांटींनीं परिवृत जुई मंडपाच्या नजीक
शोभे तेथें बकुल, विलसे रक्तपर्णी अशोक ।
वांछी तीची वदनमदिरा एक पुष्पोद्गमार्थ
माझ्या ऐसा अपर समजे पादघातें कृतार्थ ॥१५॥

मध्यें त्यांच्या स्फटिकफलका हेमयष्टी विराजे
कोळच्या वेळूसम चमकत्या पाचुनीं रोविली जे ।
बैसे तीच्यावरि तव सखा मोर सूर्यास्त होतां
ताळीं मंजुस्वनि निजकरें नाचवी त्यास कांता ॥१६॥

एभिः साधो हृदयनिहितैर्लक्षणैर्लक्षयेथा
द्वारोपान्ते लिखितवपुषौ शंखपद्मौ च दृष्ट्वा ।
क्षामच्छायं भवनमधुना मद्वियोगेन नूनं
सूर्यापाये न खलु कमलं पुष्यति स्वामभिख्याम् ॥१७॥

गत्वा सद्यः कलभतनुतां शीघ्रसंपातहेतोः
क्रीडाशैले प्रथमकथिते रम्यसानौ निषण्णः ।
अर्हस्यन्तर्भवनपतितां कर्तुमल्पाल्पभासं
खद्योतालीविलसितनिभां विद्युदुन्मेषदृष्टिम् ॥१८॥

तन्वी श्यामा शिखरिदशना पक्वबिम्बाधरोष्ठी
मध्ये क्षामा चकितहरिणीप्रेक्षणा निम्ननाभिः ।
श्रोणीभारादलसगमना स्तोकनम्रा स्तनाभ्यां
या तत्र स्याद्युवतिविषये सृष्टिराद्येव धातुः ॥१९॥

तां जानीथाः परिमितकथां जीवितं मे द्वितीयं
दूरीभूते मयि सहचरे चक्रवाकीमिवैकाम् ।
गाढोत्कण्ठां गुरुषु दिवसेष्वेषु गच्छत्सु बालां
जातां मन्ये शिशिरमथितां पद्मिनीं वान्यरूपाम् ॥२०॥

नूनं तस्याः प्रबलरुदितोच्छूननेत्रं प्रियाया
निःश्वासानामशिशिरतया भिन्नवर्णाधरोष्ठम् ।
हस्तन्यस्तं मुखमसकलव्यक्ति लम्बालकत्वा-
दिन्दोर्दैन्यं त्वदनुसरणक्लिष्टकान्तेर्बिभर्ति ॥२१॥

चिन्हें सारीं मनि धरुनि हीं शोध मद्गेह राया!
   द्वारीं चित्राकृति न चुकणें शंखपद्मां पहाया ।
यावेळीं तें खचितचि तुला भासणारें उदास
   सूर्याभावीं कधि नच पुरा पंकजश्रीविलास ॥१७॥

वेगें जाण्या धरुनि कलभासारखा सान देह
   क्रीडाशैलावरि उतर तूं आमुच्या अंबुवाह !।
माझ्या गेहीं मग चमकवी एक रेषा विजेची
   भासावी ती खचित दुसरी रांग बा! काजव्यांची॥१८॥

तेथें जी स्त्री तरुण सुदती सुस्तनी कोमलांगी
   नाभी भोऱ्यासम, कृशकटी, लोचनीं जी कुरंगी ।
श्रोणीभारें ललितगमना पक्वबिंबाधराही
   ब्रह्मयाची ती युवतिविषयीं श्रेष्ठ आदर्श राही ॥१९॥

पत्नी ती मद्हृदय दुसरें फार ना बोलणारी
   जैशी व्हावी विरहविवशा चक्रवाकी बिचारी ।
उत्कंठेनें कठिण दिवसां कंठितां आज बाला
   वाटावी ती हिमहत जणूं पद्मिनी मन्मनाला ॥२०॥

नेत्रां तीच्या रड्निरडुनी सूज आली असेल
   उष्णोच्छ्वासें अधर कुठुनी आज राहील लाल ।
बैसे जेव्हां वदन धरुनी मुक्तकेशा करांत
   त्वत्सान्निध्यीं गमत शशिचें बिंब तें दैन्ययुक्त ॥२१॥

आलोके ते निपतति पुरा सा बलिव्याकुला वा
मत्सादृश्यं विरहतनु वा भावगम्यं लिखन्ती ।
पृच्छन्ती वा मधुरवचना सारिकां पंजरस्थां
कच्चिद्भर्तुः स्मरसि रसिके त्वं हि तस्य प्रियेति ॥२२॥

उत्सङ्गे वा मलिनवसने सौम्य निक्षिप्य वीणां
मद्गोत्राङ्कं विरचितपदं गेयमुद्गातुकामा ।
तन्त्रीमार्द्रां नयनसलिलैः सारयित्वा कथंचिद्
भूयो भूयः स्वयमपि कृतां मूर्च्छनां विस्मरन्ती ॥२३॥

शेषान्मासान्विरहदिवसस्थापितस्यावधेर्वा
विन्यस्यन्ती भुवि गणनया देहलीदत्तपुष्पैः ।
मत्सङ्गं वा हृदयनिहितारम्भमास्वादयन्ती
प्रायेणैते रमणविरहेष्वङ्गनानां विनोदाः ॥२४॥

सव्यापारामहनि न तथा पीडयेन्मद्वियोगः
शङ्के रात्रौ गुरुतरशुचं निर्विनोदां सखीं ते ।
मत्संदेशैः सुखयितुमलं पश्य साध्वीं निशीथे
तामुन्निद्रामवनिशयनां सौधवातायनस्थः ॥२५॥

आधिक्षामां विरहशयने संनिषण्णैकपार्श्वां
प्राचीमूले तनुमिव कलामात्रशेषां हिमांशोः ।
नीता रात्रिः क्षण इव मया सार्धमिच्छारतैर्या
तामेवोष्णैर्विरहमहतीमश्रुभिर्यापयन्तीम् ॥२६॥

अंभोदा ! ती दिसत तुजला देवपूजेंत मग्न
किंवा माझें विरहकृश ती चित्र काढी बसून ।
मैनेला वा मधुरवचनें पंजरीं बोलवीते
स्वामीला कां स्मरसि अससी लाडकी ना तयातें ॥२२॥

वीणा अंकीं धरुनि जलदा ! नेसलेली जुनेसें
माझ्या नामावरुनि रचिल्या गीत गाण्यास बैसे ।
ओली झाली नयनसलिलें तार घेतां पुसून
आलापातें स्वकृत तरिही जातसे विस्मरून ॥२३॥

शापाचे ते कितिक महिने राहिले कष्टकारी
ठेवूनी ती करित गणना पुष्पपुंजांस दारीं ।
मत्संगा वा स्मरुनि सुखदा, चित्तखेदा हरे ती
नारी प्रायां रमणविरहीं काळ ऐसाच नेती ॥२४॥

उद्योगानें विरह न दिनीं तेवढा क्लेशकारी
निर्व्यापारा परि निशि गमे तोच दुःसह्य भारी ।
जागूनी ती अवनिवरती घालवीते निशेस
मत्संदेशें तिज सुखविण्या सौधजालांत बैस ॥२५॥

चिंताक्षीणा विरहशयनीं झोंपलेली कुशीस
भासावी ती उदयगिरिची चंद्रलेखाच खास ।
ज्या रात्रीला क्षणसम गणी भोगतांना विलास
दुःखाश्रूंनीं अजि झुरतसे तीच संपावयास ॥२६॥

पादानिन्दोरमृतशिशिरांजालमार्गप्रविष्टा-
न्पूर्वप्रीत्यागतमभिमुखं संनिवृत्तं तथैव ।
चक्षुः खेदात्सलिलगुरुभिः पक्ष्मभिश्छादयन्तीं
साभ्रेऽन्हीव स्थलकमलिनीं न प्रबुद्धां न सुप्ताम् ॥२७॥

निःश्वासेनाधरकिसलयक्लेशिना विक्षिपन्तीं
शुद्धस्नानात्परुषमलकं नूनमागण्डलम्बम् ।
मत्संभोगः कथमुपनयेत्स्वप्नजोऽपीति निद्रा-
माकाङ्क्षन्तीं नयनसलिलोत्पीडरुद्धावकाशाम् ॥२८॥

आद्ये बद्धा विरहदिवसे या शिखा दाम हित्वा
शापस्यान्ते विगलितशुचा तां मयोद्वेष्टनीयाम् ।
स्पर्शक्लिष्टामयमितनखेनासकृत्सारयन्तीं
गण्डाभोगात्कठिणविषमामेकवेणीं करेण ॥२९॥

सा संन्यस्ताभरणमबला पेशलं धारयन्ती
शय्योत्सङ्गे निहितमसकृद्दुःखदुःखेन गात्रम् ।
त्वामप्यस्त्रं नवजलमयं मोचयिष्यत्यवश्यं
प्रायः सर्वो भवति करुणावृत्तिरार्द्रान्तरात्मा ॥३०॥

जाने सख्यास्तव मयि मनः संभृतस्नेहमस्मा-
दित्थंभूतां प्रथमविरहे तामहं तर्कयामि ।
वाचालं मां न खलु सुभगंमन्यभावः करोति
प्रत्यक्षं ते निखिलमचिराद्भ्रातरुक्तं मया यत् ॥३१॥

जाळीमार्गें किरण शशिचे येत आल्हाददायी
लोभें जाई परि फिरतसे मागुती त्याच पायीं ।
दुःखाश्रूंचें मग न ढळतां लोचनांतून पाणी
अभ्रे येतां स्थलकमलिनी तेंवि हो दीनवाणी ॥२७॥

उष्णोच्छ्वासें अधर सुकतां फार अस्वस्थ झाली
साध्या स्नानें कडक बनले केश येती कपोलीं ।
स्वप्नामध्यें तरिपण घडो भेट माझी म्हणून
वांछी निद्रा जळ न ढळतां लोचनीं येत ती न ॥२८॥

वेणी साधी प्रथमदिवशीं घातली मी जियेची
शापांतीं ती प्रमुदितमनें मीच सोडावयाची ।
दुःखस्पर्शा जटिल बनल्या तीस गालावरोनी
कष्टें सारी जलधर! नखें वाढलेल्या करांनीं ॥२९॥

भूषा सारी त्यजून असते कोमलांगी उदास
तीतें शय्येवरिहि पडण्या होत भारी प्रयास ।
हें पाहूनीं जलकणमिषें आंसवें गाळशील
प्रायः सारे सदय असती अंतरीं जे रसाळ ॥३०॥

तीचें माझ्यावरि खचित बा ! प्रेम अत्यंत थोर
कैशी आहे प्रथमविरहीं बोललों मी विचार ।
मी भाग्याचा म्हणुनि वदलों व्यर्थ कांहीं न त्यांत ।
पाही सारें लवकर तुझ्या प्रत्यया कीं न येत ॥३१॥

रुद्धापाङ्गप्रसरमलकैरंजनस्नेहशून्यं
प्रत्यादेशादपि च मधुनो विस्मृतभ्रूविलासम् ।
त्वय्यासन्ने नयनमुपरिस्पन्दि शङ्के मृगाक्ष्या
मीनक्षोभाच्चलकुवलयश्रीतुलामेष्यतीति ॥३२॥

वामश्चास्याः कररुहपदैर्मुच्यमानो मदीयै–
र्मुक्ताजालं चिरपरिचितं त्याजितो दैवगत्या ।
संभोगान्ते मम समुचितो हस्तसंवाहनानां
यास्यत्यूरुः सरसकदलीस्तम्भगौरश्चलत्वम् ॥३३॥

तस्मिन्काले जलद यदि सा लब्धनिद्रासुखा स्या–
दन्वास्यैनां स्तनितविमुखो याममात्रं सहस्व ।
माभूदस्याः प्रणयिनि मयि स्वप्नलब्धे कथंचि–
त्सद्यःकण्ठच्युतभुजलताग्रन्थि गाढोपगूढम् ॥३४॥

तामुत्थाप्य स्वजलकणिकाशीतलेनानिलेन
प्रत्याश्वस्तां सममभिनवैर्जालकैर्मालतीनाम् ।
विद्युद्गर्भः स्तिमितनयनां त्वत्सनाथे गवाक्षे
वक्तुं धीरः स्तनितवचनैर्मानिनीं प्रक्रमेथाः ॥३५॥

भर्तुर्मित्रं प्रियमविधवे विद्धि मामम्बुवाहं
तत्संदेशैर्हृदयनिहितैरागतं त्वत्समीपम् ।
यो वृन्दानि त्वरयति पथि श्रामत्यां प्रोषितानां
मन्द्रस्निग्धैर्ध्वनिभिरबलावेणिमोक्षोत्सुकानि ॥३६॥

दीर्घापांगां अलक अडवे, पारखा काजळास
भ्रूभंगांची चमक न जिथें, वर्जितां वारुणीस ।
ऐसा आतां नयन हरिणीलोचनेचा स्फुरेल
होतां मीन क्षुभित सलिलीं पद्म जैसें विलोल ।।३२।।

नाहीं जीतें घडत अधुना स्पर्श माझ्या करांचा
मुक्ताजाल प्रिय जरि नसे खेळ हा रे ! विधीचा ।
संभोगांतीं सुखविलि जिला मी करें नाल्पकाल
डावी मांडी कनककदलीगौर तीची स्फुरेल ।।३३।।

तेव्हां ती बा ! दिसत तुजला घेत निद्रासुखास
राही तेथें प्रहरभर तूं वर्जुनी गर्जितास ।
स्वप्नीं माझ्या तिजसि घडल्या निर्भरालिंगनाचें
एकाएकीं कर सुटुनियां हो न वैफल्य साचें ।।३४।।

वारा झाला जलकण तुझे सेवुनी शीतवाही
होवो जागी मम सखि तयें मालतींच्या कळ्याही ।
जाळीमध्यें तुज बघिल जैं मानिनी स्तब्धनेत्रा
ऐसें बोले स्तनितवचनें गुप्तविद्युत् सुमित्रा ! ।।३५।।

मातें जाणे परमसुभगे ! मित्र तूझ्या पतीचा
आलों आहे हृदयिं धरुनी क्षेमसंदेश त्याचा ।
जे कांतांच्या अधिर असती सोडण्या पांथ वेण्या
घाई गेहांप्रति करित मी गर्जितें त्यांस जाण्या ।।३६

इत्याख्याते पवनतनयं मैथिलीवोन्मुखी सा
त्वामुत्कण्ठोच्छ्वसितहृदया वीक्ष्य संभाव्य चैवम् ।
श्रोष्यतस्मात्परमवहिता सौम्य सीमन्तिनीनां
कान्तोदन्तः सुहृदुपनतः संगमात्किंचिदूनः ॥३७॥

तामायुष्मन्मम च वचनादात्मनश्चोपकर्तुं
ब्रूयादेवं तव सहचरो रामगिर्याश्रमस्थः ।
अव्यापन्नः कुशलमबले पृच्छति त्वां वियुक्तः
पूर्वाभाष्यं सुलभविपदां प्राणिनामेतदेव ॥३८॥

अङ्गेनाङ्गं प्रतनु तनुना गाढतप्तेन तप्तं
सास्त्रेणाश्रुद्रुतमविरतोत्कण्ठमुत्कण्ठितेन ।
उष्णोच्छ्वासं समधिकतरोच्छ्वासिना दूरवर्ती
संकल्पैस्तैर्विशति विधिना वैरिणा रुद्धमार्गः ॥३९॥

शब्दाख्येयं यदपि किल ते यः सखीनां पुरस्ता-
त्कर्णे लोलः कथयितुमभूदाननस्पर्शलोभात् ।
सोऽतिक्रान्तः श्रवणविषयं लोचनाभ्यामदृष्ट-
स्त्वामुत्कण्ठाविरचितपदं मन्मुखेमेदमाह ॥४०॥

श्यामास्वङ्गं चकितहरिणीप्रेक्षणे दृष्टिपातं
वक्त्रच्छायां शशिनि शिखिनां बर्हभारेषु केशान् ।
उत्पश्यामि प्रतनुषु नदीवीचिषु भ्रूविलासा-
न्हन्तैकस्मिन्क्वचिदपि न ते चण्डि सादृश्यमस्ति ॥४१॥

ऐकोनी हें जनकतनया ज्यापरी मारुतीतें
पत्नी माझी बघिल तुजला तेंवि उत्कंठचित्तें ।
सत्कारोनी तुजसि मग ती वृत्त ऐकेल सारें
मित्रद्वारें पतिकुशल तें संगकल्प स्त्रियां रे ॥३७॥

माझ्यासाठीं म्हणुनि अथवा पुण्य संपादण्यास
तीतें सांगे पति कुशल गे ! रामगिर्याश्रमास ।
बाई ! तूझी विरहवश गे ! क्षेमवार्ता पुसे तो
संसारीं या विषमि सकलां प्रश्न तो आद्य होतो ॥३८॥

उत्कंठेनें सतत विरहीं चालल्या अश्रुधारा
उष्णोच्छ्वास प्रतिदिवस ज्या अल्प नाहीं निवारा ।
होण्या दोन्ही कृश अति तसे पोळले देह एक
दुर्दैवानें हतबल करी कल्पना तो अनेक ॥३९॥

बोलायातें अडचण जरी ना सखींच्या पुढ्यांत
कर्णीं लागे धरूनि तव जो चुंबनाशा मनांत ।
होतां आज श्रवणनयनापार दूर प्रवासी
उत्कंठेनें रचित वचनें मन्मुखें सांगण्यासी ॥४०॥

श्यामा वेली तनुस, नयनां मी मृगी नेत्र सारे
चंद्रासी गे ! वदन, अलकां तोलले बर्हभारें ।
भ्रूभंगांसी झुळझुळ नदीवीचि मी कल्पिल्याही
कांते ! कोणामधि परि तुझें पूर्ण लावण्य नाहीं ॥४१॥

त्वामालिख्य प्रणयकुपितां धातुरागैः शिलाया–
मात्मानं ते चरणपतितं यावदिच्छामि कर्तुम् ।
अस्रैस्तावन्मुहुरुपचितैर्दृष्टिरालुप्यते मे
क्रूरस्तस्मिन्नपि न सहते संगमं नौ कृतान्तः ॥४२॥

मामाकाशप्रणिहितभुजं निर्दयाश्लेषहेतो–
र्लब्धायास्ते कथमपि मया स्वप्नसंदर्शनेषु ।
पश्यन्तीनां न खलु बहुशो न स्थलीदेवतानां
मुक्तास्थूलास्तरुकिसलयेष्वश्रुलेशाः पतन्ति ॥४३॥

भित्त्वा सद्यः किसलयपुटान्देवदारुद्रुमाणां
ये तत्क्षीरस्रुतिसुरभयो दक्षिणेन प्रवृत्ताः ।
आलिङ्ग्यन्ते गुणवति मया ते तुषाराद्रिवाताः
पूर्वं स्पृष्टं यदि किल भवेदङ्गमेभिस्तवेति ॥४४॥

संक्षिप्येत क्षण इव कथं दीर्घयामा त्रियामा
सर्वावस्थास्वहरपि कथं मन्दमन्दातपं स्यात् ।
इत्थं चेतश्चटुलनयने दुर्लभप्रार्थनं मे
गाढोष्माभिः कृतमशरणं त्वद्वियोगव्यथाभिः ॥४५॥

नन्वात्मानं बहु विगणयन्नात्मनैवावलम्बे
तत्कल्याणि त्वमपि नितरां मा गमः कातरत्वम् ।
कस्यात्यन्तं सुखमुपनतं दुःखमेकान्ततो वा
नीचैर्गच्छत्युपरि च दशा चक्रनेमिक्रमेण ॥४६॥

प्रेमें माझ्यावरि कुपित तूं चित्र हें धातुरागें
काढूनी मी चरण धरिले दर्शवायासि लागे ।
अश्रू येता परि भरुनि गे ! कांहि मातें दिसेना
तेथेंसुद्धां विधिस अमुची भेट गे पाहवेना ॥४२॥

कष्टें स्वप्नीं तुजसि दयिते ! गांठुनी दृष्टचित्त
आलिंगाया सुदृढतर मी हात नेई हवेंत ।
अश्रू येती बघुनि नयनीं जे स्थलीदेवतांच्या
पर्णीं मोत्यापरि ठिबकती तेच रूपें दवाच्या ॥४३॥

ज्यांच्या योगें फिरुनि फुटती शुष्क ते देवदार
त्यांच्या स्रावें मधुर भरतो गंध ज्यांच्यांत फार ।
वारे ऐसे तिथुनि सुगुणे ! दक्षिणेसी निघाले
आलिंगी मी समजुनि तुला स्पर्शुनी कींच आले ॥४४॥

कैसा होई क्षणपरि इथें दीर्घ रात्रीस अंत
कैसा व्हावा दिवसहि तसा सर्व काळीं सुशीत ।
कांते ! येथें हृदय जळतां त्वद्वियोगव्यथांनी
आशा माझ्या सकळ मनिच्या जात जागीं विरोनी ॥४५॥

संकल्पां मी करुनि विविधां देत चित्तास धीर
तैसें तूंही विरह सुभगे ! घे न लावून फार ।
कोणालाही सतत नसतें सौख्य वा दुःख सारें
दुःखें सौख्यें मिळत असतीं चक्रनेमिप्रकारें ॥४६॥

शापान्तो मे भुजगशयनादुत्थिते शार्ङ्गपाणौ
शेषान्मासान्गमय चतुरो लोचने मीलयित्वा ।
पश्चादावां विरहगुणितं तं तमात्माभिलाषं
निर्वेक्ष्यावः परिणतशरच्चन्द्रिकासु क्षपासु ॥४७॥

भूयश्चाह त्वमपि शयने कण्ठलग्ना पुरा मे
निद्रां गत्वा किमपि रुदती सस्वनं विप्रबुद्धा ।
सान्तर्हासं कथितमसकृत्पृच्छतश्च त्वया मे
दृष्टः स्वप्ने कितव रमयन्कामपि त्वं मयेति ॥४८॥

एतस्मान्मां कुशलिनमभिज्ञानदानाद्विदित्वा
मा कौलीनाच्चकितनयने मय्यविश्वासिनी भूः ।
स्नेहानाहुः किमपि विरहे ध्वंसिनस्ते त्वभोगा-
दिष्टे वस्तुन्युपचितरसाः प्रेमराशीभवन्ति ॥४९॥

आश्वास्यैवं प्रथमविरहोदग्रशोकां सखीं ते
शैलादाशु त्रिनयनवृषोत्खातकूटान्निवृत्तः ।
साभिज्ञानप्रहितकुशलैस्तद्वचोभिर्ममापि
प्रातः कुन्दप्रसवशिथिलं जीवितं धारयेथाः ॥५०॥

कच्चित्सौम्य व्यवसितमिदं बन्धुकृत्यं त्वया मे
प्रत्यादेशान्न खलु भवतो धीरतां कल्पयामि ।
निःशब्दोऽपि प्रदिशसि जलं याचितश्चातकेभ्यः
प्रत्युक्तं हि प्रणयिषु सतामीप्सितार्थक्रियैव ॥५१॥

शापांताचा समय भगवान् जैं उठें शेषशायी
  काढी डोळे मिटुनि महिने चार हे कष्टदायी ।
आम्हीं भोगूं विविध पुढती गे ! शरच्चंद्रिकेंत
  सौख्यें सारीं खचित विरहें ज्यांस गोडी नितांत ॥४७॥

पूर्वीं कंठीं धरुनि मजला मंचकीं झोंपलीस
  जागी होतां दचकुनि रडूं तूं खरें लागलीस ।
कां गे ! ऐसे तुजसि पुसतां बोललीस स्मितांत
  धूर्ता ! स्वप्नीं तुज बघितलें अन्य–नारीसमेत ॥४८॥

ऐकोनी हें गुपित तरि गे ! जाणिजे क्षेमवृत्त
  वार्ता अन्या मजविषयिंच्या तूं न घेई मनांत ।
प्रेमा येतें विरहसमयीं ओहटी, बोल रूढ
  भोगाभावें मज परि गमे नित्य त्याच्यांत वाढ ॥४९॥

ऐशा रीतीं प्रथमविरहीं शोकमग्ना सखीला
  सांत्वोनी तूं लवकर सुहृद् ! सोड कैलाशशैला ।
तीचेंही तूं गुपितवचनें क्षेम मातें वदावें
  प्रातःकुंदापरि अबल या जीविता सांवरावें ॥५०॥

मित्राचें हें घडत वद कां कार्य तूझ्याकडून
  मोठा कैसें समजुं तुजला बोलशी ‘ मी करीन ’ ।
निःशब्दें तूं जल वितरशी चातकांना तृषांत
  इच्छापूर्ति प्रतिवचविना हीच थोरांत रीत ॥५१॥

एतत्कृत्वा प्रियमनुचितप्रार्थनावर्तिनो मे
सौहार्दाद्वा विधुर इति वा मय्यनुक्रोशबुद्धया ।
इष्टान्देशांजलद विचर प्रावृषा संभृतश्री–
र्मा भूदेवं क्षणमपि च ते विद्युता विप्रयोगः ॥५२॥

**इति महाकविश्रीकालिदासविरचितं मेघदूतकाव्यं समाप्तम् ।**

मित्रप्रेमें विधुर मजला जाणुनी वा दयेनें
माझें तूतें अनुचित जरी कार्यसिद्धीस नेणें ।
वर्षाकाळीं प्रबळ बनुनी जाइ इष्टस्थळांतें
विद्युद्भार्या क्षणमपि अशी अंतरावी न तूतें ॥५२॥

-समाप्त-

श्रीशंकरः प्रीयताम् ।

